# नवभारत

## या अंकात –




वर्ष ३० अंक पाचवा : फेब्रुवारी १९७७

वार्षिक वर्गणी १२ रुपये  अंकास रु. १–२५









नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)








महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग

**राज्य मराठी विकास संस्था**

**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com


# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका






प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई, यांचे मासिक

# नवभारत

( महाराष्ट्रराज्य साहित्य व संस्कृति मंडळ पुरस्कृत )

संपादक मंडळ

प्रा. वि. म. बेडेकर

प्रा. मे. पुं. रेगे
(का. संपादक)

मूल्य रु. १-२५

वर्ष : तिसावे

अंक : पांचवा

फेब्रुवारी १९७७

मुद्रक– पां. गो. आपटे
प्रकाशक– वि. म. बेडेकर
दी प्राज्ञ प्रेस,
३१५, गंगापुरी,
वाई ( जि. सातारा )



पत्रव्यवहार : १ संपादकीय– कार्यकारी संपादक, 'नवभारत' मासिक, प्राध्यापकांचे निवासस्थान, कीर्ति कॉलेज, दादर– मुंबई– ४०००२८.
२ व्यवस्थापकीय– व्यवस्थापक, 'नवभारत' मासिक, दी प्राज्ञ प्रेस, वाई ( जि० सातारा ) ४१२८०३

# ‘नवभारता’च्या लेखकांसाठी

– आपल्या अभ्यासपूर्ण, उद्‌बोधक लेखांचे ‘नवभारत’ स्वागतच करील.

– आपला लेख पाठविताना लेखकांनी आपला परिचय (संपूर्ण नाव, व्यवसाय, जन्मतारीख, ग्रंथ निर्मिती इ.) पाठवावा.

– ‘नवभारता’कडे यापूर्वी ज्यांनी आपले साहित्य पाठविले असेल, अशा लेखकांनीही आपला परिचय त्वरित पाठवावा.

– मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल, अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

– ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संगृहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्‌मय होऊ शकते, असा संचालक व संपादक मंडळ यांचा विश्वास आहे.

– या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

– मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणांत सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

संपादक : ‘नवभारत’ **प्राज्ञपाठशाळा मंडळ,**
**वाई.** (जि. सातारा)

अनुक्रमणिका

डॉ. र. गो. लागू

# आजच्या समाजपद्धती व विज्ञान*

इतिहासाचा आढावा घेता घेता ज्यावेळी आपण आजच्या काळापर्यंत येऊन पोहोचतो त्यावेळी इतिहास हा खऱ्या अर्थाने इतिहास न रहाता, आपल्या स्मृतीत अजूनही ताज्या असलेल्या व काल परवा घडलेल्या घडामोडींत तो मिसळून जातो. आपण आता मनाने या घडामोडींच्या अगदी जवळ असतो. अजूनही न सुटलेले अनेक प्रश्न आपल्या पुढ्यात असतात. ते सोडविण्यासाठी चाललेल्या संघर्षाचे अनेक धुरीण, अध्वर्यु आपल्या अंवतीभंवती वावरत असतात. या कारणाने, जे काही घडत आहे त्याचा अर्थ लावणे आणि विज्ञान व समाज यांच्या आजच्या प्रवाहांतील रहस्यांचा शोध घेणे विशेषच अवघड होऊन बसते. परंतु, चालू काळांतील विज्ञान, सामाजिक प्रेरणा व त्यांतील परस्परसंबंध, आजपर्यंतच्या इतिहासाचा परिपाक म्हणून कसे उदयास आले हे समजल्याशिवाय त्यांच्याबद्दलचे केवळ ऐतिहासिक विवेचन निरुपयोगी ठरण्याची शक्यता आहे. म्हणूनच, अनेक अडचणी असल्या तरीही विद्यमान इतिहासाचा अर्थ लावणे, निदान तसा प्रयत्न करणे ही आवश्यक बाब आहे. इतिहासाचा अभ्यास करताना वर्तमानकाळ एकसंधपणे भूतकाळाशी जोडला गेला पाहिजे, तरच त्या अभ्यासाला अर्थ प्राप्त होतो.

विज्ञानाला एवढ्या मोठ्या प्रमाणांत बहर आला तो आजच्या विसाव्या शतकांतच! म्हणूनच, चालू शतकांत झालेल्या विज्ञानाच्या नेत्रदीपक प्रगतीचा मागोवा घेतला नाही तर विज्ञान व समाज यासंबंधीच्या ऐतिहासिक विवेचनांतील महत्वाचा भाग गाळल्यासारखा होईल. गेल्या साठसत्तर वर्षात विज्ञानाचा जेवढा विकास झाला तेवढा त्याआधीच्या सबंध मानवी इतिहासांत झाला नाही ही वस्तुस्थिती आहे. हा केवळ तंत्रज्ञानाचा, उपयोजित विज्ञानाचा संख्यात्मक विस्तार नाही; तर याचबरोबर, सजीव व निर्जीव सृष्टीतील पदार्थांच्या मूलभूत

* ( प्रा. जे. डी. बर्नाल यांच्या ‘Science in History’ Vol. 3rd मधील काही भागाचा आनुवाद ).

स्वरूपांविषयीही, पूर्वीच्या कोणत्याही एवढ्याच कालखंडात झालेल्या प्रगतीपेक्षा, कितीतरी जास्त प्रगती गेल्या साठसत्तर वर्षात झालेली आपल्याला दिसून येईल. रशियन राज्यक्रांतीनंतर विसाव्या शतकांत झालेली दुसरी क्रांती म्हणून वैज्ञानिक क्रांतीचा निर्देश करता येईल. याचप्रमाणे आणखीही एक महत्त्वाचे स्थित्यंतर घडले आहे. जगाच्या इतिहासांत पहिल्या प्रथमच विज्ञान व वैज्ञानिक प्रत्यक्षपणे आणि उघडपणे महत्वपूर्ण आर्थिक, औद्योगिक व लष्करी घडामोडीविषयक धोरणात व कार्यवाहीत सहभागी झाले आहेत.

विज्ञानामुळे इतिहासाच्या प्रवाहावर कसे परिणाम होतात हे विशद करण्याचा आजच्या काळांत प्रश्नच उरलेला नाही, इतके ते प्रत्येकाला सहजपणे जाणवत आहे. पूर्वीच्या काळात मात्र असे नव्हते; त्या काळीही सामाजिक पद्धती, संबंध व व्यवहार यांचेवर विज्ञानाचे खरेखुरे परिणाम होत असतच. परंतु त्यांचे प्रमाण त्यामानाने अल्प असल्यामुळे मुद्दाम शोध घेऊन त्यांचे स्वरूप स्पष्ट करावे लागत असे. मानवी मनाला गुंतवून ठेवणारे प्रज्ञाप्रत्ययी विज्ञान हे इतिहासाच्या मुख्य प्रवाहापासून बरेच दूर, अलिप्त असलेले असे मानवी संस्कृतीचे एक मूल्यवान परंतु जवळजवळ निरुपयोगी आभरण आहे असा समज होण्याचा धोका पूर्वीच्या काळी होता. विसावे शतक अर्धेअधिक उलटून गेल्यानंतर मात्र हा धोका आता उलट बाजूने निर्माण झाला आहे. युद्धे व क्रांत्या यांना साक्षी असलेल्या या शतकांत मनुष्याच्या मनाला अस्वस्थ करणारी अनेक स्थित्यंतरे झाली. या स्थित्यंतरांच्या चांगल्या व वाईट, सर्वच परिणामांचे आत्यंतिक श्रेय विज्ञानाला देण्याची प्रवृत्ती आज सर्वत्र बळावलेली आपल्याला दिसून येते.

वैज्ञानिक व सामाजिक क्रांती जवळजवळ एकाच वेळी घडावी हा काही केवळ योगायोग नाही; परंतु, यांतील एका प्रकारच्या क्रांतीमुळे दुसरी घडते असे म्हणणे मात्र अगदीच बालबोध ठरेल. या दोन प्रवाहातील परस्परप्रक्रिया याहून बऱ्याच दुर्गम्य व एकमेकांत गुंतलेल्या आहेत. त्यांची सोडवणूक करून संपूर्ण आकलन करून घेणे फार महत्वाचे आहे.

याकरिता, विद्यमान कालातील प्रत्येक महत्त्वाच्या घडामोडीच्या वेळी विज्ञानाच्या वाटचालीच्या दिशा व वेग निश्चित करण्यासाठी ज्या सामाजिक व आर्थिक प्रेरणांचा हातभार लागला त्या प्रेरणांचा शोध घेणे आवश्यक ठरते. याउलट, ज्या ज्या वेळी वैज्ञानिक संशोधनामुळे व विकासामुळे आर्थिक आणि तसेच राजकीय प्रवाहांतही अर्थपूर्ण परिवर्तने घडली त्या त्या काळाचे सम्यक् दर्शन होणेही महत्त्वाचे ठरते.

अनुक्रमणिका

गेल्या साठ सत्तर वर्षांत घडलेल्या घटना अत्यंत दारुण स्वरूपाच्या आहेत. याचबरोबर, कोणाच्याही मनाला गोंधळात टाकणाऱ्या या घटना अतिशय द्रुतगतीने घडलेल्या आहेत. तरी त्यांच्यातही एक प्रकारचा आकृतिबंध आपल्याला दिसून येतो. गुंतागुंतीच्या अनेक समस्यांपोटी चाललेल्या प्रखर संघर्षाच्या धुमश्चक्रीत सध्या आपण जगत आहोत. एक समाजपद्धती जाऊन त्याजागी दुसरी पद्धती येण्याचा संक्रमणकाळ असे आजच्या युगाचे वर्णन करता येईल. १९१७ सालच्या राज्यक्रांतीनंतर जगाचे विभाजन झालेले पहिल्या प्रथम दिसून आले. हे विभाजन म्हणजे जुन्या व नव्या समाजपद्धतींतील धारदार वैधर्म्याकडे अंगुलिनिर्देश करणारा एक प्रकारचा इशाराच होता. परंतु याचबरोबर, एकोणिसाव्या शतकांतील सर्व तथाकथित एकरूप समाजात खदखदत असणारे अंतर्गत विरोध या विभाजनाने उघडचावर आणले ही गोष्टही लक्षात घ्यावयास हवी. या संघर्षांचा अर्थ कोणी कसाही लावो किंवा त्याचा शेवट कोणता होणार आहे याची भाकिते कोणी कशीही करोत; परंतु या संघर्षाचे वास्तविक अस्तित्व मात्र कुणालाही नाकारता येणार नाही. भांडवलशाहीतच लपलेल्या अंतर्गत विरोधातून समाजवादाचा जन्म झाला आणि आजही भांडवलशाहीच्या संपूर्ण यंत्रणेला हीच नवीन पद्धत एक प्रकारचे आव्हान देत आहे.

परंतु, विसाव्या शतकांतील आजपर्यंतच्या कालाचा डोळस आढावा घेतला तर यांतील बहुतेक सर्व काळी, सोविएत रशियाच्या अभिवृद्धीच्या स्वरूपांत असलेल्या आव्हानामुळे मुख्यत्वेकरून जागतिक इतिहासाला निश्चितात्मक वळण लागले असे मात्र दिसत नाही. उलटपक्षी, एकोणिसाव्या शतकापासूनच सतत कार्यशील असणाऱ्या प्रेरणा याबाबतींतील प्रमुख सूत्रधार ठरतात. पहिले महायुद्ध व १९३० सालची प्रचंड मंदी या, चालू शतकातील दोन निर्णायक घटना, संपूर्णतः भांडवलशाहीतील अंतर्गत राजकीय व आर्थिक अंर्तविरोधाची फलिते होती. त्याचप्रमाणे दुसऱ्या महायुद्धाकडील वाटचाल व त्या युद्धाच्या सुरुवातीच्या अवस्था हाही भांडवलशाहीचाच अटळ परिपाक होता. या सर्वच काळांत भांडवलशाहीचा सतत विकास होत राहिला, आणि आजही जगाच्या फार मोठ्या भागावर याच अर्थपद्धतीचे वर्चस्व आहे. अर्थात हा भाग हळूहळू कमी होत आहे ही गोष्ट निराळी !

पहिल्या प्रथम फक्त रशिया, व त्यानंतर चीन व इतर अनेक देश ज्यांत आजमितीस समाविष्ट झाले आहेत त्या समाजवादी जगाची उत्क्रांति मात्र

अपरिहार्यपणे वेगळ्याप्रकारे झाली आहे. एक तर या देशांची सुरुवातीची स्थिती अत्यंत हलाखीची, जीवघेण्या दारिद्र्याची होती. त्याचबरोबर, परकीयांचा सतत हस्तक्षेप होत असताही, तेथील जनतेला आपले सर्व प्रयत्न, एक संपूर्णपणे नवीन अशी अर्थसंघटना उभारण्याकडे केंद्रित करावे लागले. हे निकराचे प्रयत्न चालू असता इतर ठिकाणी लक्ष देणे त्यांना शक्यच नव्हते. या कारणांमुळे जागतिक अर्थकारण, विज्ञान व तंत्रज्ञान इत्यादि क्षेत्रांत समाजवादी देश अगदी अलीकडल्या काळांतच कुठे अग्रेसर अंशदाते म्हणून यथार्थ दावा सांगू लागले आहेत.

जागतिक प्रवाहांत समर्थपणे उतरण्यासाठी समाजवादी देशांना भांडवलवादी देशांच्या तुलनेने, जरी अशाप्रकारे काही विलंब लागला असला तरीसुद्धा या देशांत घडलेल्या विकासप्रक्रिया, त्यांच्या केवळ प्रमाणावरून जेवढे आपण समजतो त्यापेक्षा कितीतरी अधिक महत्वाच्या आहेत. त्यांच्या अभ्यासावरून, देशातील नैसर्गिक व मानवी साधनसंपत्तीचे सेवायोजन एका वेगळ्या, अभिनव पद्धतीने कसे करावे याचे दिग्दर्शन होऊ शकते. भांडवलशाही राष्ट्रांतील कामगारवर्गावर व त्याहीपेक्षा विकसनशील देशातील लोकांच्या मनावर या पद्धतीचा चांगलाच परिणाम झालेला दिसून येत आहे. या देशांनी नुकतेच काही प्रमाणांत राजकीय स्वातंत्र्य संपादन केले आहे. संपूर्ण आर्थिक स्वातंत्र्यासाठीही त्यांची जोरदार मागणी सुरू आहे. भांडवलवादापासून नव्या दिशेने घडणाऱ्या स्थित्यंतरांत विकसनशील देशांच्या आर्थिक व सामाजिक आकांक्षा हा एक नवीनच प्रभावी घटक आहे, व त्याची नोंद घेणे क्रमप्राप्त आहे.

मोठमोठ्या कारखानदारसंघांची आणि विश्वस्तनिधी मंडळांची बेसुमार वाढ होऊन त्यांचे पूर्ण वर्चस्व प्रस्थापित होणे ही भांडवलवादी राष्ट्रांत विसाव्या शतकांत घडलेल्या आर्थिक घडामोडींचे प्रमुख लक्षण आहे. हे संघ व्यापारी व औद्योगिक स्वरूपाचे आहेत. जगात सर्वत्र त्यांची नांवेही आज प्रसिद्ध आहेत-- ड्यू पाँट, जनरल मोटर्स, क्रप, इंपीरियल केमिकल, आय्. जी. फार्बन इत्यादि. यातच स्टँडर्ड ऑईल, मॉर्गन यांचीही एकाधिकार साम्राज्ये येतात. एकोणिसाव्या शतकाच्या अखेरच्या कालांतच स्पष्टपणे दिसून येणाऱ्या मक्तेदारीच्या प्रवृत्तीमागे आर्थिक स्वरूपाची कारणपरंपरा होती. तत्कालीन बाजारपेठेतील स्पर्धेला सतत तोंड द्यावे लागणाऱ्या लहान लहान व्यवसाय संस्थांपेक्षा, अंशतः किंवा पूर्णतः एकाधिकार गाजविणाऱ्या विश्वस्तनिधिमंडळांना आर्थिक नफा मिळवण्याच्या दृष्टीने व तसेच आपत्काली निभावून जाण्याच्या दृष्टीनेही, खूपच अनुकूलता होती. बाजारपेठेतील मागणी-पुरव-

ठ्याच्या चढउतारांचा, या कंपन्यांच्या व्यवहारांवर काहीच परिणाम होऊ शकत नसे. तंत्रक्षेत्रातील नवनवीन क्लृप्त्यांचाही त्यांना उद्योगधंद्यांच्या वाढीसाठी फायदा झाला. उदाहरणार्थ, अंतर्ज्वलन इंजिनाच्या विकासामुळे मोटार उत्पादनाचा उद्योग सुरू झाला व त्यामुळे नव्यानेच सुरू झालेल्या इंधनतेलाच्या उद्योगधंद्याला विस्तृत बाजारपेठ उपलब्ध झाली. यांत्रिक विपुलोत्पादनासारखी तंत्रक्षेत्रातील नवक्लृप्ती फक्त एकाधिकार उद्योगानाच वापरता येण्यासारखी होती. अशी क्लृप्ती वापरून नफ्याची इच्छित पातळी गांठण्यासाठी अत्यंत मोठ्या प्रमाणात उत्पादन करायचे म्हणजे प्रचंड भांडवलपुरवठ्याची आवश्यकता होती, व हे भांडवल एकाधिकार कंपन्याच पुरवू शकत होत्या. अवाढव्य भांडवली खर्चाच्या आवश्यकतेमुळे, या कंपन्या निर्माण करण्यांत विज्ञानानेही एकप्रकारे मदत केली ही गोष्ट ध्यानात घेण्यासारखी आहे. बहुधा, पूर्णतः विज्ञानाच्या पायावर उभे राहिलेले रासायनिक आणि विद्युत्-साधनांचे उत्पादन करणारे कारखाने आरंभापासूनच एकाधिकारस्वरूपाचे होते. परिणामी, औद्योगिक विज्ञान व तंत्रज्ञान याबाबतचे जवळजवळ ८० टक्के संशोधन या एकाधिकार संस्थांच्या संशोधनखात्यांतच केले गेल्याचे आपल्याला दिसून येईल.

विश्वस्तनिधिमंडळे आणि कारखानदारसमूह यांच्या अस्तित्वामुळे, स्पर्धात्मक पातळीच्या कितीतरी वरच्या पातळीवर गोठविलेल्या किंमतीना पूर्ण संरक्षण मिळाले, याच्याच जोडीला या मक्तेदारी उद्योगांना, अभियांत्रिकी व वैज्ञानिक क्षेत्रांतील नवनवीन तंत्रांचा अवलंब करून, प्रचंड प्रमाणात उत्पादन करणे शक्य झाले. यामुळे तयार मालाच्या उत्पादनखर्चात त्यांना खूपच बचत करतां आली, व भरघोस नफा मिळविता आला. परिणामतः, अनेक छोटे मोठे उद्योग आपल्यांत विलीन करून आणि नवीन क्षेत्रे काबीज करून, या एकाधिकार उद्योगांना उत्पादनांची विविधता व वैपुल्य या दोन्हीही बाबी मोठ्या प्रमाणांत वाढविता आल्या. देशातील अर्थसंघटनेवर नियंत्रण मिळविण्यासाठी त्यानी एकप्रकारे सर्वव्यापी जाळेच टाकले आहे — यांतील फक्त अल्पांशच नेहमी लोकांपर्यंत पोचेल याची सर्वतोपरी खबरदारी घेतली जाते — व यामुळे त्यांना प्रत्यक्षतः संपूर्ण सुसंरक्षित स्थिती प्राप्त झाली आहे. त्यांच्या अवाढव्य आक्रमणापुढे पारंपरिक पद्धतीने चालत आलेले छोटेउद्योग एकतर नेस्तनाबूत झाले, किंवा त्या मोठ्या उद्योगसमूहांत विलीन केले गेले. असे असले तरीही, उत्पादनाच्या क्षेत्रामध्ये अग्रेसर ठरलेली एकाधिकार कारखानदारी, पारंपरिक व कामचलाऊ पद्धतीने उत्पादन करणाऱ्या छोट्या उद्योगांच्या मानाने निश्चित-

पणे पुढली पायरी होती यांत तिळमात्र शंका नाही. तरीसुद्धां, केवळ नफ्यासाठी सर्व उत्पादन या सूडप्रवृत्तीतून याही प्रचंड उद्योगांना सुटका करून घेता आली नाही, हे आजपर्यंतच्या अनुभवावरून स्पष्ट झाले आहे. कामगारवर्गाचे शोषण करण्याची जितकी अधिकांश क्षमता या उद्योगयंत्रणानी संपादन केली त्याच प्रमाणांत त्या कामगारांची, त्यांनीच निर्माण केलेला माल खरीदण्याची कुवत कमी होत गेली. नवीन बाजारपेठा धुंडाळण्याची व असलेल्या संरक्षित ठेवण्याची जरूरी उत्पन्न झाली. यामुळेच या एकाधिकार साम्राज्यांना, स्वतःच्या हित-संबंधांचे पोषण करण्यासाठी, सरकारी धोरणे व कार्यवाही यावर प्रभावी नियंत्रण ठेवून आपल्या मनाप्रमाणे त्याची दिशा ठेवणे भाग पडले.

१८८० सालानंतर भांडवलशाही देशांचे सरकारी धोरण, मुख्यत्वेकरून परराष्ट्रविषयक व वसाहतीविषयक धोरण, स्वतःच्या देशांतील एकाधिकार कंपन्यानी निर्माण केलेला माल विकण्यासाठी जागतिक बाजारपेठेचा अधिकांत अधिक भाग काबीज करण्याच्या उद्देशाने आखले गेल्याचे दिसून येईल. यांतही विशेषतः पोलाद व यंत्रसामुग्री यासारख्या भांडवली मालाच्या निर्यातीवर जास्त भर होता. साम्राज्यवादाचा हाच तो आकृतिबंध की ज्याला भांडवलशाही राष्ट्रानी एके काळी जगभर मिरवला पण चालू घटकेला मात्र तो दूषणास्पद ठरून त्याचे कांहीतरी यातुर मातुर समर्थन करण्याची त्यांच्यावर वेळ आली आहे. इंग्लंड किंवा अमेरिका यांच्या राष्ट्रध्वजाखाली निरनिराळे तोंडवळे धारण करणारा साम्राज्यवाद हाच भांडवलशाहीचा आजमितीसही ठळकपणे दिसणारा आविष्कार आहे.

निरनिराळ्या देशांतील एकाधिकार कंपन्यानी जागतिक बाजारपेठ आपसांत विभागून घ्यावी, व स्वतःच्या पूर्णतः संरक्षित क्षेत्रात व्यापार करावा, अशा प्रकारची व्यवस्था वेळोवेळी करण्यात आली. परंतु, अशी सलोख्याची व्यवस्था कायम टिकू शकली नाही, व यातून ईर्ष्या व वितुष्टे मात्र वाढू लागली. ज्या ज्या वेळी बाजारपेठेची विभागणी, एखाद्या देशाच्या सत्तासामर्थ्याशी अनुरूप नाही असे दिसून आले, त्या त्या वेळी प्रत्यक्ष लष्करी बळाने ती परिस्थिती बदलावी एवढा एकच मार्ग होता. गेल्या सत्तर वर्षात झालेल्या अनेक लढाया, युद्धे, लहानमोठे लष्करी संघर्ष – ज्यामुळे अनेक उत्पात घडले आणि सर्व जग हवालदील झाले – याच साम्राज्यवादी धोरणाचे भयंकर परिणाम आहेत. पोलाद व रासायनिक उत्पादनांच्या क्षेत्रात अग्रेसर असणाऱ्या एकाधिकार कंपन्यांना, युद्धे व त्यासाठी चाललेली तयारी ही एक आवश्यक अशीच बाब होती. युद्धामुळेच त्यांच्या उत्पादित मालाला अतोनात मागणी आली, व चांगल्या

अनुक्रमणिका





किंमतीला मालाचा उठाव झाला. शीतयुद्धाचा काल त्यांना वरदान ठरला. या कालामध्ये प्रचंड लष्करी खर्च झाला, आणि तो सतत वाढत राहिला. यामुळे, या देशांतील यांत्रिक उत्पादनाच्या अतिरिक्त, शिल्लक उत्पादिताची विल्हेवाट लावण्याचा प्रश्न काही प्रमाणात सुकर झाला. खरे पाहिले तर, आज जगांत जी मोठी भांडवलदारी राष्ट्रे आहेत त्यांच्या अर्थकारणाचा, युद्धासाठी तयारी हा एक अविभाज्य भाग होऊन बसला आहे. याचा आणखी एक फायदा या राष्ट्रांना होतो. नफ्यासाठी नव्हे तर जनतेच्या उपयोगासाठी सर्व उत्पादन या सूत्रावर आधारलेल्या समाजवादी राष्ट्रांच्या अर्थकारणावर परराष्ट्रांच्या या युद्धपिपासू धोरणामुळे अधिकच बोजा पडतो. म्हणूनच या भांडवलशाही पश्चिमी राष्ट्रांना निःशस्त्रीकरणासंबंधी धास्ती वाटते. केवळ राजकीय नव्हे तर आर्थिक हेतूपोटीही ही राष्ट्रे निःशस्त्रीकरणयोजना सतत लांबणीवर टाकीत आली आहेत.

गेल्या ३०–४० वर्षातील वैज्ञानिक प्रगतीचा वेग व विज्ञानाचा उपयोग करण्याची क्षेत्रे व पद्धत याबाबतीत देशपरत्वे जे फरक आढळतात ते समजण्यासाठी येथपर्यंत पाहिलेल्या परिस्थितीची पार्श्वभूमि उपयोगी पडू शकेल. सजीव व निर्जीव जगताच्या सत्यस्वरूपाविषयींची जिज्ञासा हा सर्व विज्ञानाचा मूलभूत समान पाया असल्यामुळे जगांत सर्वत्रच विज्ञान व तंत्रज्ञान यांचे प्रवाह साहजिकपणे एकमेकांमध्ये मिसळून गेलेले दिसतात. मात्र, विज्ञानाच्या या सार्वत्रिक आकृतिबंधातही देशोदेशानुसार ठळक अशा स्वरुपाचे फरकही दिसून येतात. हे फरक त्या त्या देशांत प्रचलित असलेल्या राजकीय व आर्थिक दृष्टिकोनामुळे निर्माण झाले आहेत.

येथे विवेचनाच्या सोयीसाठी आपल्याला जगाचे तीन विभाग कल्पिता येतील. पहिला विभाग म्हणजे भांडवलशाही जग. यात पश्चिम युरोप, उत्तर अमेरिका व त्यांचे ऑस्ट्रेलिया व दक्षिण आफ्रिकेतील भाईबंद, आणि साम्राज्यवादी युगात राजकीय स्वातंत्र्य टिकवून औद्योगिक दृष्टचा विकसित झालेला जपानसारखा आशिया खंडातील देश, हे सर्व येतात. दुसरा विभाग समाजवादी जगाचा म्हणून समजता येतो. यांत सुरुवातीला फक्त सोविएत रशिया हे एकच समाजवादी राष्ट्र होते. परंतु, त्यानंतर पूर्व युरोपातील देश, पुनरुत्थित प्राचीन संस्कृतीचा वारसा असलेले चीनच्या जनतेचे महाप्रजासत्ताक, आणि अलीकडेच मुक्त झालेले उत्तर कोरिया व व्हिएटनाम यांचा समावेश झालेला आहे. हे दोन राष्ट्रसमूह सोडून उरलेल्या राष्ट्रांची तिसऱ्या विभागात गणना करतां येईल. या विभागातील देशांचे राजकीय धोरण जरी बव्हंशी अलिप्ततावादाचे असले

अनुक्रमणिका

तरी आर्थिक दृष्टया मात्र परिणामतः हे देश भांडवलशाही 'विमुक्त जगाचा' एक अंकित भागच आहेत. यामुळे त्यांना अजूनतरी 'समाजवादी' म्हणून संबोधता येणार नाही. हा विभाग निरनिराळ्या बहुजिनसी स्वरूपाच्या राष्ट्रांचा आहे. प्रबोधनकालीन संस्कृतीचा वारसा स्पेन व पोर्तुगाल यांच्या वसाहतींमुळे, ज्यांना मिळाला ती लॅटीन अमेरिकन राष्ट्रे जशी यांत येतात, त्याचप्रमाणे भिन्न संस्कृति असलेले अरबस्तानांतील देश आणि भारत, तसेच नुकतेच अंशतः मुक्त झालेले आफ्रिका व आशियांतील देश, हेही याच विभागात मोडतात. यांतील प्रत्येक विभागात, विज्ञानाची आजची स्थिती, तेथील वैज्ञानिक कामगिरीचे स्वरूप, आणि भविष्यकालीन अपेक्षा या सर्वांत खूप फरक आहे.

भांडवलशाही सरकारांची प्राथमिक जबाबदारी सर्व प्रकारचा शस्त्रसंभार निर्माण करून युद्धसज्जता राखणे ही असल्यामुळे त्यांचा सर्वाधिक खर्च याच बाबींवर होत आला आहे. एकाधिकार कारखानदारी, साम्राज्यवाद, व युद्ध यामधील दुवे जसे दृढ होत गेले तसे या सरकारांनी स्वतःच्या अधिक्षेत्राखाली नवनवीन शस्त्रास्त्रांचा विकास करून एकाधिकार संस्थांमार्फत त्यांची विपुल प्रमाणांत निर्मिती करण्याचे धोरण अवलंबिले. ही शस्त्रास्त्रे — जेट विमाने, पथनियंत्रक क्षेपणास्त्रे, आक्रमक अग्निबाण, अणुबाँब व हैड्रोजन बाँब – केवळ त्यांच्या मूळ कल्पनेत व जुळवणीतच नव्हे तर त्यानंतर त्यांच्यात सतत केलेल्या सुधारणांतही वाढत्या श्रेणीने विज्ञानाधारित स्वरूपाची होत आहेत. परिणामी प्रचंड झपाट्याने वाढत चाललेल्या या शस्त्रास्त्रविषयक संशोधन व विकास-कार्यात भांडवलशाही सरकारे अधिकाधिक गुंतली आहेत. अशा परिस्थितीत, मूलभूत विज्ञानसंशोधनावरील खर्च लष्करी संशोधनखर्चाच्या तुलनेने नगण्य आहे यांत विशेष आश्चर्य नाही. परंतु, लष्करी संशोधनाप्रमाणेच मूलतः उपयोजित स्वरूपाचे असलेले औद्योगिक संशोधनही लष्करी क्षेत्रापुढे खालच्या क्रमांकाचे ठेवण्यात आले आहे ही नोंद घेण्यासारखी बाब आहे.

उद्योगधंद्यांच्या राष्ट्रीयीकरणाचा विज्ञानावरील परिणाम हाही विज्ञानाच्या लष्करी अभिवचनांच्या तुलनेने अगदीच क्षुल्लक झालेला आढळतो. याचे कारणही स्पष्ट आहे. खाजगी क्षेत्रांतील हे उद्योग किफायतशीर चाललेले नसल्यामुळे त्यामध्ये आधीच संशोधनाला फारसा वाव देण्याचा प्रश्न नव्हता, व आता ते उद्योग राष्ट्रीकृत झाल्यावरसुद्धा अशा प्रकारचे संशोधन, निम्न-क्रमाचे ठरविण्यात आलेले असल्यामुळे दुर्लक्षिले जाणे अपरिहार्य होते. विद्या-पीठांबाबत मात्र याउलट वेगळी परिस्थिती आहे. एकट्या इंग्लंडमध्येच नाही

तर विमुक्त स्वातंत्र्यवादाचा बालेकिल्ला म्हणून गणल्या गेलेल्या अमेरिकेतही, विद्यापीठांना पुरवाव्या लागणाऱ्या निधींची वित्तव्यवस्था सरकारने वस्तुतः स्वतःच्याच शिरावर घेतल्यावर, संरक्षणविषयक संशोधनप्रकल्पांच्या दबावामुळे विद्यापीठातील संशोधनाच्या एकूण महत्त्वपातळीतच प्रचंड फरक पडला आहे. संशोधनावरील सरकारी नियंत्रण, निदान इंग्लंडमध्ये, जरी तूर्त फारच अप्रत्यक्ष स्वरूपाचे असले तरी विज्ञानाच्या मूलभूत संशोधनाची सर्वसाधारण दिशाच भांडवलशाही सरकारांच्या हातात सुपूर्द झाली आहे असा याचा प्रत्यक्षतः अर्थ होतो.

सत्ताकेंद्रीकरणाच्या या प्रक्रिया चालू असतां, ज्यांनी एकोणिसाव्या शतकातील अर्थकारणावर संपूर्ण व ्स्व ठेवले होते त्या स्वतंत्र व खुल्या स्पर्धेवर विश्वास असणाऱ्या खाजगी भांडवलदारांचे माहात्म्य अल्प काळातच कमी करण्यात आले. याचा अर्थ असा मात्र नव्हे, की छोटया उद्योजकाला यानंतर काहीच स्थान उरले नाही. अद्ययावत पद्धतीच्या मोठया उद्योगधंद्याना, त्यांना साहाय्यभूत अशा प्रकारच्या छोटया छोटया उद्योगांची अतिशय गरज असते. यामुळे, निरनिराळे सुटे भाग पुरविणाऱ्यांना व असंख्य उपकंत्राटदारांना, अर्थ-सत्ताकेंद्रीकरण झाल्यावरही, उद्योगसाहसाच्या दृष्टीने वाव राहतोच. तरीसुद्धां हे लघुउद्योग जवळजवळ सर्वस्वी मोठया उद्योगांवरच अवलंबून राहिल्यामुळे तुलनेने त्यांचे महत्व कमी होते. या लहान व्यवसायसंस्था मोटया उद्योगांच्या एक प्रकारे आश्रित होतात व स्वतःचे स्वतंत्र स्थान गमावून बसतात.

सतराव्या शतकापासून विज्ञानाची भरभराट करण्यात ज्या वर्गाचा सिंहाचा वाटा होता त्या हौशी वैज्ञानिकांवर व नवशोधकांवरही अशाच प्रकारचा प्रतिष्ठाक्षय होण्याचे दुर्दैव ओढवले. यानंतर, वैज्ञानिक व त्यांच्याबरोबर तंत्र-ज्ञानीही, त्याचप्रमाणे बहुतेक सर्व वैद्यकीयडॉक्टर हे परंपरागत अर्थाने व्यावसा-यिक राहिले नाहीत. आपल्या तंत्रकौशल्यासाठी पैसे आकारून व्यवसाय करणारे, किंवा स्वतंत्र बुद्धीने, स्वतःच्या आवडीचे काम करणारे तज्ज्ञ असे त्यांचे स्वरूप आता राहिले नाही, तर ते सर्व, सरकारी खात्यांचे किंवा मोठया उद्योगसंस्थांचे केवळ कार्यकारी किंवा कर्मचारी बनले.

सुरवातीला हे स्थित्यंतर सावकास झाले परंतु, दुसऱ्या महायुद्धकालांत व त्यानंतर मात्र त्याचा वेग झपाट्याने वाढला. एकंदर राष्ट्रयंत्रणेच्या संदर्भात झालेल्या वैज्ञानिकांच्या या स्थानावनतीमुळे, विज्ञानक्षेत्रांत कार्य करणाऱ्या व्यक्ती म्हणूनच केवळ नव्हे, तर विज्ञानकार्याचे मूल्यमापन करण्याच्या त्यांच्या

दृष्टिकोनातच सखोल बदल झाले. अशा परिस्थितीत वैज्ञानिकांच्या एकूण विचारविश्वांतच मूलगामी परिवर्तने होतात हे लक्षात घेणे जरूर आहे. संशोधन-व्यवसायाशी, चरितार्थाचे एक साधन म्हणून वैज्ञानिकवर्गाचा पराधीनतेचा संबंध असतो हे खरे आहे. एवढ्यापुरती तरी वैज्ञानिकांची स्थिती सर्वसाधारण मनुष्यमात्राप्रमाणेच असते. परंतु याबरोबरच संशोधन प्रेरणांची सुरक्षितता, विज्ञानाची अभिवृद्धी व उपयोजनक्षेत्र इत्यादिसंबंधी त्यांचे खास उत्तरदायित्व असते हेही विसरून चालणार नाही. वैज्ञानिकांच्या प्रतिष्ठापूर्ण स्वातंत्र्याचा जर कोणत्याही कारणाने संकोच झाला तर त्यांच्या या दोन भूमिकांमध्ये मूलभूत स्वरूपाचा अंतर्विरोध निर्माण होतो.

भांडवलशाही राष्ट्रातील अर्थपद्धतीमुळे विज्ञानावर कोणते परिणाम झाले यासंबंधीच फक्त आतापर्यंत आपण थोडक्यात विवेचन केले. सोविएत रशियांत आणि समाजवादाच्या दिशेने ज्यानी निर्णायक पावले टाकली आहेत अशा देशात, विज्ञानाची वाटचाल व अभिवृद्धी निराळ्याच प्रकारे झाली आहे. या देशांत तेथील सरकारने सर्व उद्योगधंदे आपल्या ताब्यांत घेतले आहेत. तेथे एकाधिकार नाही आणि स्पर्धाही नाही. अशा स्थितीत, विज्ञानाची सर्वतोपरी भरभराट व्हावी व समग्रतेने त्याचा जनतेला उपयोग व्हावा यासाठी या देशा-मधून बुद्धिपुरस्सर व जाणीवपूर्वक एकात्म प्रयत्न चालू आहेत. पूर्वी खाजगी मालकीच्या असलेल्या येथील औद्योगिक व कृषिविषयक संस्था आता तशा राहिलेल्या नाहीत. परंतु, विज्ञानाची सर्वंकष भरभराट साधण्यासाठी या संस्थांना दुय्यम दर्जाचे स्थान न देता, निराळाच एक विधायक मार्ग या देशांनी स्वीकारला. केवळ सन्मानदर्शक पदे प्रदान करणाऱ्या संस्था असे ज्यांचे क्रिया-शून्य स्वरूप होते त्या अकादमीना उच्च शिक्षणाच्या व संशोधनाच्या क्रियाशील केंद्रसंस्था बनवून त्यांनी हे साधले आहे. या अकादमीत व त्यांच्या संलग्न संस्थांत, तसेच आता विद्यापीठांतही एकत्र आलेले वैज्ञानिकच या कामाचे नियोजन करतात. हे करताना, अधिकाधिक फलदायी ठरेल असा विज्ञानाचा आंतरिक, अंगभूत विकास साधण्याबरोबरच, नैसर्गिक व मानवी साधनसंपत्तीचा पुरेपूर उपयोग करण्यासाठी जास्तीत जास्त साहाय्य कसे देता येईल, हे दोन उद्देश सतत डोळ्यापुढे ठेवलेले असतात. याचे एक उदाहरण येथे देता येईल.

रशिया व चीन या देशात वैज्ञानिकांच्या मोठमोठ्या गटांनी पाहणी करून उजेडात आणलेल्या नैसर्गिक साधनसंपत्तीचे प्रमाण, आधीच्या काळात केलेल्या सर्वात जास्त आशावादी अंदाजापेक्षाही कितीतरी अधिक आहे.

विपुल संख्येने उत्कृष्ट भूशास्त्रज्ञ तयार करण्याचे प्रशिक्षण देण्याचा अग्रक्रम असलेला, नैसर्गिक साधनसंपत्तीचा शोध घेण्याचा हा कार्यक्रम या देशांत जारीने चालू आहे. त्यांच्या अभ्यासपूर्ण सल्ल्यावरच, किफायतशीर होण्यासाठी कारखाने, उद्योगधंदे कोठे स्थापावेत हे ठरविले जाते. याउलट, तथाकथित विमुक्त जगांत सर्वत्रच, नैसर्गिक संपत्तीबद्दलचे ज्ञान अतिशय त्रोटक स्वरूपाचे आहे. उद्योगसंस्थांनी केलेले तुरळक सर्वेक्षण व खाजगी हितसंबंधाना धक्का पोहोचू नये याची गाढ चिंता असलेल्या सरकारी खात्यामार्फत, अत्यंत काटकसरीने करण्यात आलेल्या काही मामुली अधिकृत पाहण्या, यांच्या बळावरच ही तुटपुंजी माहिती मिळविलेली आहे. सहज उपलब्ध होऊ शकणाऱ्या खनिज-संपत्तीचाही फारच थोडा भाग महायुद्धापूर्वी या देशात हस्तगत झाला होता, व युद्धानंतर काही अंशी जास्त चांगल्या प्रकारे केलेल्या पाहण्यांवरून खूपच विपुल प्रमाणात हे साठे मिळाले, यावरून ही वस्तुस्थिती स्पष्ट होते.

पूर्व युरोपातील पोलंड, हंगेरी, रुमानिया, बल्गेरिया, व पूर्व जर्मनी या देशांत झालेली विज्ञानशिक्षणाची व संशोधनाची पुनर्रचना, देशपरत्वे जरी पुष्कळ प्रमाणात भिन्न असली तरी, सर्वसाधारणपणे ती सोविएत रशियाच्या धर्तीवरच केली आहे. अकादमीचे पुनरुज्जीवन, आणि उद्योगधंदे व शेती यांच्या विकासासाठी वैज्ञानिक संशोधनाचा घनिष्ठ सहभाग, ही याही देशांतील विज्ञानशिक्षणाची व संशोधनाची प्रमुख लक्षणे आहेत. या सर्वच देशांत, लहान-मोठ्या मात्रेने विज्ञानाची परंपरा दीर्घकालपर्यंत चालत आलेली आहे व त्याचा परिणाम म्हणून त्या त्या प्रमाणात उद्योगधंद्यांचा विकास झालेला आहे. परंतु, तेथील विज्ञानशिक्षण व व्यवसाय ही क्षेत्रे संख्येने अल्प असलेल्या बुद्धिजीवी वर्गापुरतीच वंशपरंपरागतपणे मर्यादित होती. या क्षेत्रातून शेतकरी –कामगारवर्ग हा जवळजवळ बगळलाच गेला होता. अलीकडच्या काळात मात्र उच्च शिक्षणाचा मोठ्या प्रमाणावर प्रसार झाल्यामुळे या देशांकडून जागतिक विज्ञानसंपदेत निर्णायक स्वरूपाची भर पडेल अशी सार्थ अपेक्षा करण्यास हरकत नाही.

१९४९ साली स्वतंत्र झालेल्या चीनची परिस्थिती, सोविएत संघराज्य किंवा पूर्व युरोपीय देश यांच्याहून, अनेक बाबतीत निराळी होती. एक तर हा देश अवाढव्य, त्यांतच लोकसंख्या अफाट, तसेच या देशांत अत्यंत पूर्वापार कालापासून अखंडितपणे चालत आलेली विद्याव्यासंगाची श्रेष्ठ परंपरा! केवळ यामुळे नव्हे तर आणखीही एका ऐतिहासिक कारणाने चीन

देशाच्या समस्या इतर समाजवादी देशांहून भिन्न आहेत. सबंध देशाची पिळवणूक करण्यासाठी प्रविष्ट झालेल्या साम्राज्यशाहीच्या मागोमाग चीनमध्ये आधुनिक विज्ञान अवतरले. म्हणजे हा फार तर गेल्या शंभर–सवाशें वर्षांचा काल ! त्याआधी चीनमध्ये विज्ञानाची विशेष प्रभावी परंपरा होती असे नाही. एकोणिसाव्या शतकाची शेवटची पन्नास वर्षे व विसाव्या शतकांतील पहिली तितकीच वर्षे, या शंभर वर्षाच्या कालांत साम्राज्यवादी शक्तींनी सदासर्वकाळ युद्धे व जुलूम यांच्या स्वरूपांत चीनमध्ये हैदोस घातला. चीनमधील क्रांत्योत्तर समस्यांचे स्वरूप या ऐतिहासिक व भौगोलिक पार्श्वभूमीवर समजून घेतले पाहिजे.

याचा स्वाभाविक परिणाम म्हणजे १९४९ सालपर्यंत अत्यंत हलाखीच्या जीवनमानांत खितपत पडलेला चीन देश हा अविकसित देशाचे एक नमुनेदार उदाहरण म्हणून जगाच्या पटावर राहिला. परंतु, स्वातंत्र्यानंतर मात्र सगळेच बदलले. जगांत कुठेही घडले नाहीत असे बदल चीनमध्ये घडले. हे बदल इतके नाविन्यपूर्ण व इतक्या विस्तृत प्रमाणावर घडले की तसे कधी कुठे झालेच नाही. सर्व प्रकारच्या सार्वत्रिक शिक्षणाची जोरदार मोहीम काढून व त्याद्वारां नैसर्गिक व मानवी साधनसंपत्तीचा पुरेपूर विकास करून राष्ट्राच्या पुनर्बांधणीची किमया चीनने संपादन केली आहे.

आधुनिक औद्योगिक राष्ट्रासाठी आवश्यक असलेला निष्णात वैज्ञानिक व तंत्रज्ञांचा संघ केवळ काही दशकांतच तयार होईल असा फार मोठा प्रयत्न चीनमध्ये केला जात आहे. नैसर्गिक संपत्तीचा उपयोग व्हावा, व भारी अवजड उद्योधंद्यांचा विकास व्हावा, यासाठी एवढा थोडा वेळही थांबण्याची चीनची तयारी नाही. म्हणून, भांडवलशाही देशांपेक्षाही मोठ्या प्रमाणावर, भूशास्त्रज्ञ व धातुशास्त्रज्ञ यांना प्रशिक्षण देण्याचे विशेष प्रयत्न तेथे होत आहेत. याचबरोबर, पुनर्रचना केलेल्या अॅकॅडिमिया सिनिका या संस्थेच्या सर्वसाधारण नियंत्रणाखाली, विज्ञानसंशोधनाला सक्रिय चालना दिली जात आहे. सोविएत संघराज्याप्रमाणेच, मूलभूत विज्ञानाचा विकास व देशाच्या आर्थिक गरजापूर्तीसाठी सहाय्यदान या दोन उद्दिष्टांचा संयोग घडवून आणणे हे या संस्थेच्या कार्यपद्धतीचे सूत्र आहे. आज चीनमध्ये पहिल्या दर्जाचे विज्ञानसंशोधन होत आहे, आणि थोड्याच कालावधीत हा देश जागतिक विज्ञानक्षेत्रांत अग्रेसर स्थान मिळवील अशी स्पष्ट चिन्हे दिसू लागली आहेत.

गेल्या २५-३० वर्षांत, आशिया व आफ्रिका खंडांतील कोट्यवधि जनता निदान राजकीय दृष्ट्या तरी स्वतंत्र झाली. तसेच, पूर्वीच्या काळी स्पेन व पोर्तुगाल

यांची साम्राज्ये असलेल्या लॅटिन अमेरिकन देशांत आर्थिक मुक्तिकरणाच्या चळवळींना पुन्हा चालना देण्यात आली. या स्वातंत्र्यसंग्रामांची व आर्थिक चळवळींची पूर्वपीठिका व जडणघडण भांडवलशाही किंवा समाजवादी देशांहून निश्चितपणे विभिन्न आहे. या 'नव्या जगांतील' देशांमध्ये, १९५९ सालानंतरचा क्युबा एवढा एकच देश, जमीनसुधारणा, औद्योगीकरण, शिक्षण, निरक्षरता निर्मूलन, विज्ञानसंशोधन या सर्व दृष्टीने, एक मार्क्सप्रणीत समाजवादी देश म्हणून दाखविता येईल. बाकीच्या राष्ट्रांमधील आर्थिक स्थिती अजूनही भांडवलशाही अर्थकारणाच्या वर्चस्वाखाली बऱ्याच अंशी राहिली आहे असे दिसते.

याशिवाय, आणखीही एक गोष्ट लक्षात घेण्यासारखी आहे. देशांतर्गत औद्योगिक विकासाकडे दुर्लक्ष करून, युरोपखंडातील उद्योगप्रधान देश व उत्तर अमेरिका यांना लागणारा कच्चा माल पुरविणे हेच या देशांच्या अर्थकारणाचे मूलसूत्र होते. परिणामतः, मुक्तिपूर्व व त्यानंतरच्या लगतच्या काळात त्यांचे विज्ञान एका विचित्र अवस्थेत निश्चेष्ट होऊन पडले होते, कुंठित झाले होते. उत्तम मेहनत करण्यासाठी कर्मचारीप्रजा धट्टीकट्टी रहावी म्हणून वैद्यकक्षेत्र, नगदी पिकाचे उत्पादनक्षेत्र, व कच्च्या मालाचे संस्करणक्षेत्र एवढ्याचपुरते बहुतेक करून तेथील विज्ञान मर्यादित झाले होते. निरनिराळी खनिजे ही या देशांच्या उत्पादनातील एक महत्वाची बाब असूनही, भूशास्त्र व खाणकामविषयक बहुतेक संशोधन मात्र पुढारलेल्या उद्योगप्रधान देशांतूनच केले जात असे. यामुळे स्वातंत्र्यपूर्व काळात, विज्ञानाचा सर्वांगीण विकास या राष्ट्रांमध्ये होऊच शकला नाही. जनतेच्या उपभोगासाठी आणि परदेशांत व्यापार करण्यासाठी लागणारा तयार माल देशांतच निर्माण व्हावा म्हणून सर्वत्र उद्योगधंदे उभारावेत, व विज्ञानाचा विकास करून या दोन्ही परस्परोत्तेजक प्रक्रिया वाढीस लावाव्यात, हे स्वातंत्र्यपूर्व काळात या देशांना करता आले नाही; यासाठी स्वातंत्र्याचा उदय व्हावा लागला. इंग्रजी अंमलाखाली सर्वांत जास्त काळ कंठलेल्या भारतासारख्या देशात 'विज्ञान–औद्योगीकरण अन्योन्य विकासा'ची प्रक्रिया आजही फारशी पुढे गेली आहे असे दिसत नाही.

परंतु, या सर्व राष्ट्रांतून या दिशेने पाऊले टाकली जात आहेत, व यासाठी यांतील बऱ्याचशा ठिकाणी, आर्थिक व राजकीय स्वातंत्र्याची निदान प्रामाणिक आकांक्षा बाळगून आहेत एवढ्या मर्यादित अर्थाने का होईना समाजवादी प्रकृति असलेली सरकारे स्थापन झाली आहेत. विज्ञानाच्या विकासाला परिणामतः अत्यंत हानिकारक ठरणारी सरंजामी जमीनदारी पद्धती

हे या देशांचे खरे म्हणजे मोठे दुर्भाग्य आहे.* या सर्व देशांमध्ये, आधुनिक विज्ञानाचा दीर्घकालीन अनुभव असलेली फक्त भारत व अरब राष्ट्रेच आहेत. याशिवाय, युरोपमधल्या कुठल्याही देशापेक्षां प्राचीन असलेल्या आपापल्या संस्कृतिबंधावर या देशांनी यशस्वीपणे आधुनिक विज्ञानाचे कलम बांधले आहे. तरीही विज्ञाननिर्मितीच्या क्षेत्रांत एखादा प्रतिभावान् शास्त्रज्ञ, तुरळकपणे, अधूनमधूनच या देशांत निर्माण झाला ही वस्तुस्थिती आहे. त्या त्या वेळी या देशांना जागतिक लौकिक मिळाला हेही खरे आहे. परंतु निरक्षरतेच्या व शिक्षणपराङ्मुखतेच्या महारोगामुळे, शास्त्रज्ञ तयार करण्यावर कमालीच्या मर्यादा पडणाऱ्या या देशांना अजून बराच लांबचा पल्ला गांठायचा आहे.

या देशांतील विज्ञानप्रवाहाचा त्यांच्यापेक्षा द्रुतगतीने विकसित होणाऱ्या उद्योगप्रधान देशांशी संपर्क यावा म्हणून युनेस्कोसारख्या आंतर्राष्ट्रीयसंघटना काही प्रमाणात सहाय्य करीत आहेत. तरीसुद्धा आजच्या घटकेला चिंता वाटते ती यासाठी की, या विकसनशील देशांनी कितीही जलद भरभराट साधण्याचा प्रयत्न केला तरी तिचा वेग, पुढारलेल्या देशांच्या तुलनेने कमीच ठरत आहे. यामुळे या दोन राष्ट्रसमूहांतील दरी दिवसेंदिवस, अरुंद होण्याऐवजी, अधिकच रुंद होत आहे. नवजगतांतील विज्ञानाचा जागतिक विज्ञानमंचावर प्रवेश व्हावा यासाठी यापेक्षा अधिक शिकस्तीचे प्रयत्न पद्धतशीर होणे आवश्यक आहे.



* अलीकडे मात्र भारतात तरी यासंबंधांत निरनिराळ्या पातळ्यांवर काही प्रागतिक पाऊले उचलली गेली आहेत.

अनुक्रमणिका

प्रा. श. श्री. पुराणिक

# " इतिहासाचार्य "

---

वाई येथील एरंडे यांच्या वाड्याच्या तिसऱ्या मजल्यावरच्या एका अंबर-खान्यात कापडी पेटाऱ्यात ती पत्रे गेलीं दीडशे वर्षे पडून राहिली होती. वर्षे गेली, उन्हाळे गेले, पावसाळे गेले, मराठ्यांची राजवट गेली, इंग्रजांची राजवट आली; पण तीं पत्रें त्या कोपऱ्यातल्या अंधारात तशीच पडून राहिली होती. पण त्यांना अखेर वाचा फुटली. त्यानाही दिवसाचा प्रकाश शेवटी दिसला. पुण्याच्या एका तरुण संशोधकाच्या कानावर ती नवल–वार्ता गेली आणि तो तेथे आला. आला आणि त्या पत्रांनी त्याला झपाटलेच. रात्र नाही दिवस नाही. सकाळ नाही संध्याकाळ नाही, जेवण नाही, झोप नाही अशा तन्मयतेने त्या पत्राचा तो अभ्यास करू लागला. त्या पत्रांचे जिह्वार त्याने भेदले. त्याच्या भक्तीने प्रसन्न होऊन त्या जुन्या लेखातील ते इतिहासपुरुष त्याच्याशी बोलू लागले. त्या पत्रांनी त्या माणसाच्या जीवनात क्रांति केली व त्या माणसाने मराठ्यांच्या इतिहासात नवे पर्व सुरू केले. तीं पत्रें म्हणजे पानपतच्या घनघोर संग्रामापूर्वी बुंदेलखंड–अंतर्वेदचे पेशव्यांचे मामलतदार गोविंदपंत बुंदेले यानी सदाशिवरावभाऊंना लिहिलेली अस्सल पत्रें होत व तो माणूस म्हणजे विश्वनाथ काशीनाथ राजवाडे हे होत.

" Blessed is the man who has found his work to do. Let him ask for no other reward. ज्या माणसाला आपले जीवितकार्य सापडले आहे, तो धन्य होय. त्याला दुसऱ्या धन्यतेची जरूर नाही." असे कार्लाईलने म्हटले आहे, त्याची प्रचीती राजवाड्यांच्या जीवनाकडे पाहून येते. वाईच्या त्या प्रसंगापासून राजवाडे यांनी आपले जीवित मराठ्यांच्या इतिहासाची साधने शोधण्यास वाहिले. ही साधने म्हणजे अस्सल पत्रे, सनदा, निबाडपत्रे, शकावलि इत्यादी जी खेडोपाडी, नगरोनगरी पसरली होती. ती

अनुक्रमणिका






शोधण्यासाठी राजवाडे यांनी जवळ जवळ सगळा हिंदुस्थान पायाखाली घातला. सबंध कोकणपट्टी तीन वेळा पादाक्रांत केली एकदा खलाटीने, एकदा वलाटीने, एकदा मधल्या रस्त्याने. महाराष्ट्रातले गड किल्ले कोट दुर्ग देवळे मशिदी पाहिल्या. मेणवलीचे नाना फडणीसांचे प्रचंड दप्तर तपासले. गगनबावड्याचे पंत अमात्यांचे दप्तर पाहिले. सातारकर छत्रपतींच्या तबेल्यात कागदपत्राचे रुमाल पडले होते ते सोडवून आणले. बारामतीकर गोविंदराव काळ्यांचे दहा हजार पत्रांचे दप्तर शोधले. सासवडच्या पुरंदऱ्यांच्या समुद्रासारख्या विस्तीर्ण कागदपत्रात अवगाहन केले. ओझर्ड्याच्या सूर्याजी पिसाळ देशमुखांची पत्रे पाहिली. पिंपरीच्या भागवतांची ब्रह्मेंद्रस्वामीबद्दलची पत्रे तपासली. राघोबादादाचे साहाय्यक चिंतो विठ्ठल रायरीकर यांचे कागदपत्र पाहिले. रोहिडखोऱ्यातील देशपांडे, जेधे, निबचे सदानंद, एक ना दोन शिवकालापासून पेशवाई अखेरपर्यंत हजारो कागदपत्र पाहिले आणि त्यांना विवेचक प्रस्तावना जोडून बावीस खंडात प्रसिद्ध केले. एवढे प्रसिद्ध करूनही त्याच्यापाशी एकंदर पन्नास हजार अस्सल पत्रे प्रसिद्ध करण्याजोगी राहिली होती.

हे संशोधनास प्राणभूत असलेल्या साधनाचे पर्वताएवढे भांडार जमविताना त्याना अनन्वित कष्ट झाले. इतिहासाची दृष्टी आपणाकडे मुळातच कमी; त्यामुळे आपल्या कागदपत्रांचा दुरुपयोग होईल या संशयाने इनामदार आपले कागद दाखवत नसत. त्यांत राजवाडे यांच्या संतापी स्वभावामुळे काम आणखी बिघडे. कऱ्हाड जवळ विंग नावाच्या खेड्यातील एका गृहस्थाने असाच नकार दिल्यामुळे ते त्याला अद्वातद्वा बोलले व उन्हातान्हातून पांच मैल तणतणत परत आले. कऱ्हाडात एका वाण्याजवळ ४।५ दौलताबादी कागद होते ते देण्याबद्दल त्यांनी त्याची पुष्कळ आर्जवे केली, ढळढळा रडले; पण त्याला दया येईना, शेवटी एक रुपया त्याच्या अंगावर फेकला, तेव्हा त्याने ते कागद दिले. एक ब्राह्मण त्याना जुन्या पोथ्या देईना, तेऱ्हा 'तू मेलास म्हणजे तुझ्या विधवा बायकोकडून त्या पोथ्या मी घेऊन जाईन ' असे ते त्याला म्हणाले. चिंचवडच्या रबडे यांच्या घराच्या तिसऱ्या मजल्यावरील रद्दीतून भिजलेल्या व चिकटलेल्या पानांच्या अवस्थेतील 'राधामाधव विलासचंपू'ची पोथी त्यांनी शोधून काढली. ओझर्डेकर पिसाळ देशमुखांची पत्रे प्रसिद्ध करताना 'सूर्याजी पिसाळ हा राजद्रोही होता' अशी टीप त्यांनी जोडल्यामुळें सदर देशमुखानी ती पत्रे प्रसिद्धीला देण्याचे नाकारले. मेणवलीचे नाना फडणीसाचे दप्तर म्हणजे त्यांना मंत्रमुग्ध करणारा अजबखानाच वाटला. त्यांतील पंचवीस हजार पत्रांपैकी प्रत्येक पत्र महत्वाचे आहे. त्या

पत्रांतील राघोबा, आनंदीबाई इत्यादि व्यक्तींचे कागद निरनिराळे बांधण्यासाठी त्यांनी स्वतः ऐंशी रुपयांचे कापड आणले. पण नाना नेहमी वापरीत, त्यांतले एक दोन नकाशे गहाळ झाले, त्यांचा संशय राजवाड्यांवर घेतल्याबरोबर त्यांनी संतापून ते काम सोडून दिले. पुढेही जेव्हा त्याना मेणवली दप्तराची आठवण होई तेव्हां त्यांचे अंतःकरण दुःखाने भरून येई. पण आपला संतापी स्वभाव, लोकांची अनास्था, देशाचे पारतंत्र्य, सरकारची उदासीनता आणि पांचवीला पुजलेले दारिद्र्य यांना तोंड देऊन त्यांनी जे कार्य केले त्याला तोड नाही.

'आशिष्ठो दृढिष्ठो बलिष्ठो युवा स्यात् ।'

असे श्रुतिवचन आहे, ते राजवाडे यांना तंतोतंत लागू पडते. कार्पण्य, दैन्य, दौर्बल्य, रडवेपणा यांना त्यांच्या शब्दकोशांत जागा नव्हती. त्यांचा आत्मविश्वास उदंड होता. आपण शंभर वर्षे जगणार ही त्यांना खात्री होती; व त्यांच्या वज्रासारख्या शरीराकडे पाहिले म्हणजे त्यांत अतिशयोक्ति वाटण्याचे काही कारण नव्हते. मैलच्या मैल चालले तरी ते दमत नसत व तासन् तास लिहिले किंवा वाचले तरी त्यांना थकवा येत नसे. भाताच्या ढिगावर दूध व तूप ते ओतत व खात, पैंज लावली म्हणजे शंभर केळ्यांचा घड बैठकीला फस्त करीत. दोन धाबळ्या, दोन धोतरें, पांच-चार भांडीं, व कागदपत्रांची पोतीं घेऊन ते अखंड संचार करीत पहिली पत्नी वारल्यानंतर त्यांनी लग्न केले नाही. पहिल्या लग्नाचा भागीदार नाहीसा झाला की, शेष भागीदाराने संन्यास वृत्तीने देव व देश यांची शक्त्यनुसार सेवा करावी असे त्यांचे मत होते; त्यामुळे त्यांना संसार उरला नव्हता. धुळ्याचे भट, साताऱ्चे पंडित, कऱ्हाडचे पांडु आण्णा शिराळकर, इस्लामपूरचे मुंडले, चाळीसगावचे भागवत, मिरजेचे खरे शास्त्री या आपल्या खऱ्या सुहृदांकडे ते कधी उतरत व यानीही राजवाडे यांच्या स्वभावाचे कंगोरे सांभाळून त्यांना निःसीम सौहार्द दाखविले. राजवाडे यांनी रसनेचे लाड बिलकूल केले नाहीत. वाईला वर्षभर दररोज एक चिपटे तांदूळ खाऊन ते राहत. त्यावेळेला तीन पैशाना चिपटेभर तांदुळ मिळत. त्यावेळी ते म्हणत, 'मला तीन पैसे मिळाले म्हणजे जगांत धडधाकट राहता येईल.' " माझा खाजगी खर्च फारच थोडा आहे. पंचवीस रुपयाहून जास्त नाही. बाकी सर्व मिळकत मी इतिहासाच्या कामी लावतो; पण तेवढ्याने काम भागत नाही. "

त्यांचे जीवन हे समर्पण होते व म्हणून प्रत्येक क्षणाचा ते हिशेब ठेवीत असत. वयाला पंचेचाळिस वर्षे होऊन गेल्यावर त्यांनी आत्मनिरीक्षण केले. या

विसाला नवे ४६ वे वर्ष लागले. ५४ राहिली. त्यात सर्व जगताला व राष्ट्राला पोषक अशी हितकारक कृती होवो. आजपर्यंत फक्त स्मृति-राष्ट्रीय स्मृति तयार करण्यात काळ गेला. यापुढे कृती, कृती, कृती झाली पाहिजे- नाहीतर व्यर्थ ! चाळीस वर्षे आणिक सतत मेहनत झाली पाहिजे. आरोग्य, उत्तम हवा, उत्तम पाणी, उत्तम जागा, उत्तम शुद्ध अन्नही मिळाले तर हेही होईल. ईश्वराची कृपा अपरंपार हवी.

उपेक्षेइतके मारक प्रतिभेला काहीच नाही असे त्यांचे मत होते. त्यांनी एवढे संशोधन केले, वासुदेवशास्त्री खरे यांनी घरदार विकून पटवर्धनी दप्तर छापले, पण ज्या संस्थानिकांची व इनामदारांची दप्तरे त्यांनी शोधिली व छापली त्यांना त्याचे काहीच सोयर-सुतक नव्हते. या संशोधनाच्या बाबतीतील चमत्काराने ते अनेक वेळा विव्हळ होत. "जी भरतभूमि पितृपूजे-विषयी इतकी प्रख्यात आहे, तीत प्रस्तुतकाळी पितरांची अशी बोळवण व्हावी हा कालमहिमा विचित्र होय. असो." राजे निजले आहेत, जहागीरदार डुलक्या घेत आहेत, आणि इनामदार झोपा काढीत आहेत. ते जागे होईपर्यंत जागे झालेले जे मध्यम स्थितीतले आपण त्यांनी राष्ट्राच्या या पितरांचे स्मरण कायम ठेविले पाहिजे. आपले सामर्थ्य यद्यपि जुजबी आहे तथापि पुण्यकर्माच्या प्रीत्यर्थ ते खर्चिले पाहिजे.

राजवाडे यांनी ज्याप्रमाणे इतिहासाच्या साधनांचे संकलन केले, त्याचप्रमाणे त्या साधनावरून निष्पन्न होणाऱ्या मराठ्यांच्या इतिहासाची मूलग्राही मीमांसाही केली. त्यांच्या साधनांच्या ग्रंथांना लिहिलेल्या प्रस्तावना, व राधामाधवविलास चंपू आणि महिकावतीची बखर या ग्रंथाच्या प्रस्तावनांत मराठ्यांच्या साम्राज्याच्या उदयास्ताची त्यांची ही मीमांसा ग्रथित झाली आहे. त्यांच्या पूर्वी इतिहासाचे हे तत्त्वज्ञान महाराष्ट्रांत फक्त न्या. रानडे यानी 'मराठी सत्तेचा उदय' या ग्रंथात सांगितले होते.

'जसे ज्याचे तत्त्वज्ञान तसा त्याचा प्रपंच' आणि 'ज्याचे हत्यार त्याचे राज्य' असे राजवाड्यांचे दोन सिद्धांत आहेत. मराठ्याचे राज्य चिरस्थायी होऊ शकले नाही, कारण मराठा व इंग्रज हा संघर्ष दोन सत्तांमधील नसून दोन संस्कृतीमधील होता. मराठ्यांची संस्कृति ही Metaphysical आध्यात्मिक तर युरोपियन संस्कृति ही Positive म्हणजे भौतिक होती. युरोपियनां-पुढे मराठ्यांचे शस्त्रही हतबल ठरले व शास्त्रही हतबल ठरले. कारण ज्या वेळेला यूरोपात बेकन, डेकार्ट हे सृष्टपदार्थांचे शोध लावीत होते, त्यावेळेला

एकनाथ, तुकाराम, दासोपंत, निपटनिरंजन हे साधु महाराष्ट्रात पंचभूतांना मारून ब्रह्मसाक्षात्कारात राष्ट्राला नेऊन मुक्त करण्याच्या खटपटीत होते. अश्यांना स्क्रू, टाचणी, बंदूक व तोफा यांचा विचार वमनप्राय वाटल्यास त्यांत नवल काय ? या प्रवृत्तीमुळेच विज्ञानाची उपासना येथे झाली नाही, व शहाजी शिवाजीपासून नाना फडणिसापर्यंत शस्त्रांच्या बाबतीत मिंधे होण्याची जी धुरंधरांना लज्जा वाटली नाही, तिचे कारण म्हणजे, ' उत्तम रेखीव व नेमके हत्यार होण्याला शास्त्रीय ज्ञानाची जी पूर्वतयारी राष्ट्रात व्हावी लागते, ती त्या काली महाराष्ट्रात नव्हती. ' – कारण हत्यार हे राष्ट्राच्या एकंदर संस्कृतीचे मापक आहे. ' जशी ज्या राष्ट्राची संस्कृति तसे त्या राष्ट्राचे हत्यार. '

परंतु, विज्ञानाची जी हेळसांड मराठ्यांच्या हातून झाली, ती त्यांच्या साम्राज्याच्या विनाशाचे कारण असले, तरी ते कारणही ज्याचे कार्य होते, असे अधःपाताच्या कारणाचे कारण म्हणजे मराठ्यांची पराकाष्ठेची प्रपंचविन्मुखता होय. तीनशे वर्षे महाराष्ट्रांत संतांळ्यांचे जे बंड माजले होते, त्याने ऐहिक दृष्ट्या महाराष्ट्राला अतिशय पंगु करून ठेवले. " संत म्हणजे अत्यंत पंगुपणाचा केवळ मूर्तिमंत पुतळाच होय. संताला खाणे नको, पिणे नको, वस्त्र नको, प्रावरण नको, काही नको, एक विठोबा मिळाला म्हणजे सर्व काही मिळाले. ऐहिक सुखदुःखें, ऐहिक उपभोग, ऐहिक व्यवहार, त्यांच्यात मन घालणे संताचे काम नव्हे. इहलोक हा संतांचा नव्हेच. राजा कोणी असो, सारा कोणी घेवो, संताला त्याचे काही नाही. असल्या या संतमंडळींच्या हाती विचारांची दिशा जाऊन महाराष्ट्र तीन शतके पंगू बनून राहिले." या जगापासून पळून जाणाऱ्या निवृत्तिपर वेदांतांच्या पकडीतून रामदासांनी महाराष्ट्र-धर्माचा पुरस्कार करून महाराष्ट्राची सुटका केली. कुरुक्षेत्रावर पराक्रमी श्रीकृष्णाने सांगितलेली 'गीता' आणि जयिष्णु प्रवृत्तिधर्माचा उपदेश करणारा दासबोध हे एकच आहेत, व प्रपंच व परमार्थ यांचा लाभ करून देणारे ते उत्तमोत्तम तत्त्वज्ञान आहे. महाराष्ट्र धर्माच्या तत्त्वज्ञानाने मराठ्यांच्या मनोरचनेत घडवून आणिलेली क्रांति हे स्वराज्याचे आद्य कारण होय. दुर्दैवाने पेशव्यांना या मनःक्रांतीचे, उपदेशकांचे, ग्रंथांचे व व्याख्यानांचे महत्व समजले नाही. त्यामुळे त्यांचे साम्राज्य टिकले नाही. " ग्रंथ, व्याख्याने वगैरे साधनसंपत्ति पेशव्यानी तयार न केल्यामुळे हिंदुस्थानातील मराठे सरदार व तद्देशीय संस्थानिक व सामान्य जन पानिपतच्या मोहिमेच्या अगोदर व नंतर मराठ्यांच्या विरुद्ध लढले यांत तिळमात्र संशय नाही.– राज्ये मिळवण्यास जसा तोफांचा व शिपायांचा उपयोग होतो, तसा तीं कायम राखण्यास व जतन करण्यास व्याख्यानांचा व विचारी पुरुषांचा

होतो–" रामदासाचा धडा विसरला गेला व ब्रह्मेंद्रस्वामीचा गिरवला गेला. आपसात कलह, चुगल्या करण्याच्या ह्या वृक्षाला कडू फळे आली. नाना फडणीसाच्या कारकीर्दीत जी मराठ्यांच्या साम्राज्याची इमारत टोलेजंग भासत होती, ती त्याच्यानंतर दहापाच वर्षांत डबघाईस आली; कारण ह्या राष्ट्राची राष्ट्रीय नीतिमत्ता ब्रह्मेंद्रस्वामीपासून बिघडत बिघडत बाजीरावाच्या कारकीर्दीत पूर्णपणे नासून गेली होती. व्यक्तीच्या चारित्र्याप्रमाणे राष्ट्रालाही चारित्र्य असते, व ते गेले म्हणजे सर्व संपले. When character is lost, everything is lost हे वचन व्यक्तीप्रमाणेच राष्ट्रालाही लागू आहे.

राजवाडे यांची या मीमांसेत काही बाबतीत त्यांची मते अतिरेकी वाटतील. संतांच्या कार्याची सामाजिक फलश्रुति सांगताना त्यांची त्याचीच मते निवळली व त्यानी म्लेच्छवत् झालेल्या प्रजेला परम कारुणिक बुद्धीने भक्तिमार्ग संतांनी आर्यसमाजात थोपवून धरले व मराठी भाषेत ग्रंथरचना करून महाराष्ट्र भाषेचे यावनी आक्रमणापासून संरक्षण केले, असे श्रेय संतांना मुक्त कंठाने दिले. परंतु राज्याचा उदय कशाने होतो व राज्ये कशाने कोसळतात याची त्यांनी केलेली नैतिक, वैज्ञानिक आणि सांस्कृतिक चिकित्सा काल जितकी बरोबर होती, तितकीच आजही आहे व आज जितकी बरोबर आहे, तितकीच उद्याही राहील तिला काळाचे भय नाही.

मराठी भाषेव्यतिरिक्त दुसऱ्या भाषेत राजवाडे यांनी एक अक्षरही लिहिले नाही. ते मोडी लिपीत भराभर लिहीत व कोणाकडून तरी त्याचे बालबोधीत रूपांतर करून घेत. 'इंग्रजीत लिहावयाचे नाही' अशी मुळी त्यांची प्रतिज्ञाच होती. पण सांगितले तर नवल वाटेल की डेक्कन कॉलेजात विद्यार्थी असताना बारा आणि बारा चोवीस तास त्यांचा सारा व्यवहार इंग्रजीत चाले. या एवढ्या अवधीत बहुधा ते मराठी विसरूनच जावयाचे, पण विष्णुशास्त्री चिपळूणकरांच्या 'निबंधमाले'ने त्यांचा बचाव केला. 'विष्णुशास्त्री चिपळूणकरांच्या टीकात्मक निबंधांनी इंग्रजीच्या या खग्रासापासून बचाव केला. काव्येतिहाससंग्रहकारांच्या ऐतिहासिक पत्रांनी स्वदेश म्हणून काही आहे हे मला कळले, परशुरामपंत तात्या गोडबोले यांनी छापलेल्या काव्यांनी मला महाराष्ट्र सारस्वताचा अभिमान वाटू लागला'– 'भाषांतर' मासिकाच्या पहिल्याच अंकात 'देशाचा, धर्माचा व आचाराचा खरा अभिमान जागृत राहाण्यास बोलणे, चालणे, शिकणें व विचार करणे मराठींत झाले पाहिजे'... वस्तुतः मराठी माणसाला मराठी भाषेचा अभिमान असावा ही अगदीं नैसर्गिक गोष्ट आहे. पण त्याही बाबतींत उत्तरोत्तर त्यांची तीव्र निराशा होत गेली. शारबो-

पासक संमेलनाच्या अध्यक्ष पदावरून भाषण करताना त्यांनी मराठीला जगू द्यावयाचे कीं मरू द्यावयाचे हाच प्रश्न उपस्थित केला. कारण पहावें तेथें, घरीदारीं सार्वजनिक संस्थांत, लेखनांत, भाषणांत, राज्यकरभारांत इंग्रजीचें सर्वकष आक्रमण चाललेलें आहे. जोपर्यंत स्वराज्यसाधन नाहीं व मराठींत व्यवहार नाहीं तोपर्यंत साहित्य संमेलनांना अर्थ नाही 'मराठी भाषा मरणपंथाला लागलेली आहे. तिचे साहित्य कसलें करिता ? गुलामांना स्वतंत्र भाषा असलेली कोणी ऐकली नाही व पाहिली नाही.'

नास्ति कश्चिदविषयो धीमतां नाम ।

बुद्धिमंताला अविषय कोणताच नसतो असें कालिदासाचें वचन आहे. राजवाडे हें त्या वचनाचें चालते बोलतें उदाहरण होते. त्यांनी मराठ्यांच्या इतिहासाचे मंथन केले, त्याचप्रमाणे 'संस्कृत भाषेचा उलगडा' केला. मराठी छंदावर निबंध लिहिलें, त्याचप्रमाणें मराठी व्याकरणाचा परामर्श घेतला. भारतीय विवाह–संस्थेची चिकित्सा केली, त्याचप्रमाणे महाराष्ट्राचा वसाहतकाल ठरविला. पाणिनि कालनिर्णय केला, त्याचप्रमाणे कादंबरीची चिकित्सा केली. भारत इतिहास संशोधक मंडळ स्थापलें त्याचप्रमाणे आरोग्य मंडळेही काढली. त्यांच्या संकल्पांना अंत नव्हता. वेदमंत्रांचे वर्गीकरण करून स्वतःच्या उपपत्तीप्रमाणे वेदांचा अर्थ ते लावणार होते. आर्यांच्या विजयाचा ग्रंथ लिहिणार होते. महाभारतकालीन शेकडो निबंधांची रूपरेखा त्याच्या मनात तयार होती. धातुकोश आणि नामकोश ते सिद्ध करणार होते. पंच्याऐंशी वर्षापर्यंत हें काम करून पुढे पंधरा वर्षे ते एकांतवास पत्करणार होते. अफाट जिद्दीचा माणूस, त्यांचे संकल्पही तसेच अफाट होते.

पण ते व्हावयाचे नव्हते.– मॉंटकोकन या प्रसिद्ध इतिहासकाराला त्याच्या वयाबद्दल एकदा विचारले तेव्हा तो म्हणाला, 'अजून तेरा वर्षांनी मी शंभर वर्षांचा होईन.' आणि दोन दिवसानी तो मेला. शंभर वर्षे जगण्याची महत्वाकांक्षा धरणारे राजवाडे बासष्टाव्या वर्षीच थकले. 'सारा दिवस डोळ्यापुढे चक्कर येते व सध्याकाळ झाली म्हणजे बरे वाटते' अशी ते तक्रार करू लागले. अखंड श्रम, सतत मनन व हालअपेष्टा यांनी ते अकालीच थकले. त्यांना रक्तदाबाचा विकार झाला. धुळ्यास ते आले. भट, देव, चांदोरकर यांनी त्याची शुश्रूषा केली. त्याना बरे वाटू लागल्यावर ते दौऱ्यावर गेले. राजवाड्यांचे धातुकोशाचे काम चालू होते. एकदा जेवून आचवून येत असता डोक्यात कळ आली व त्यांचे प्राणोत्क्रमण झाले. तो दिवस ३१ डिसेंबर १९२६ चा होता. योगायोग

असा की मृत्यूच्या वेळेस ते एकटेच होते. त्यांचा कोणीही ऋणानुबंधी जवळ नव्हता.

Two men I honour and no third. First, the toil worn craftsman who conquers the earth and the second who is seeing toiling for the spiritually indispensable not daily bread but the bread of Life असे कार्लाईलने म्हटले आहे. जगात दोनच माणसे आदरणीय आहेत. एक जमिनीची मशागत करून भाकरी देणारा कष्टाळू शेतकरी आणि दुसरा मनाची मशागत करून विचाराचे अन्न आत्म्याला देणारा विचारवंत असा कार्लाईलच्या म्हणण्याचा भावार्थ आहे. आणि भिक्षा मागायला गेले असतांना तू काय काम करतोस, कोणती शेती तूं करितोस असा प्रश्न विचारणाऱ्या शेतकऱ्याला मी आत्म्याची शेती करितो असे मार्मिक उत्तर देणाऱ्या बुद्ध भगवानाची कथा प्रसिद्धच आहे. आपला देश शेतकऱ्यांचा आहे. आणि टिळकांनी म्हटल्याप्रमाणें शेतकरी हा राष्ट्राचा आत्मा आहे. त्यामुळे शेती व कालवे, खते व बियाणे, पीक आणि पाणी यांना आपण महत्व देतो ते योग्यच आहे. पण शेतकऱ्याप्रमाणे विचारवंत हाही राष्ट्राचा अपर आत्माच आहे. कारण, राजवाड्यांनी म्हटल्याप्रमाणे राज्ये मिळविण्यास जसा तोफांचा व शिपायांचा उपयोग होतो तसा ती कायम राखण्यास व जतन करण्यास व्याख्यानांचा व विचारी पुरुषांचाही होतो. त्यामुळे स्वतंत्र काय किंवा परतंत्र काय कोणत्याच राष्ट्राला राजवाड्यासारख्या विचारवंतांचे विस्मरण परवडण्यासारखे नाही. धान्य पिकविणारा शेतकरी व शस्त्र चालवणारा शस्त्री ज्याप्रमाणे राष्ट्रास हवे आहेत, त्याचप्रमाणें शास्त्र जाणणारे शास्त्री आणि स्वप्ने पाहणारे द्रष्टे हेही राष्ट्राला हवेच आहेत. आपल्या क्रांतदर्शी प्रतिभेने दिक्कालाचा पडदा भेदून उज्वल स्वप्ने पहाणारे कवी आणि द्रष्टे ज्या राष्ट्रात निपजत नाहीत, ती राष्टे नष्ट होतात असे मॅझिनीचेच वचन आहे. 'The nations that Lave no vision perish'



अनुक्रमणिका








श्री. शरद पाटील

# दासप्रथाक गुलामगिरी

---

भारतासारख्या खंडप्राय देशात, जेथे थेट सिंधु संस्कृतीपासून निमान व पैशाचे व्यवहार सहअस्तित्वात राहिलेले आहेत, तेथे निमान-व्यवहाराच्या प्रारंभिक अवस्थेतील प्राथमिक व आकस्मिक मूल्यरुपाची पैशाच्या मूल्यरूपाशी गल्लत होणे स्वाभाविक आहे; [१५२] वासुदेव शरण अग्रवाल या सूत्राचे विवरण करताना निर्माणांतर्गत मूल्याचे ( value ) पैशातील किंमतीशी ( price ) समीकरण करतात –

'... वस्तुविनिमयात जी निमान वस्तु द्यावयाची तिची किंमत ( मूल्य ) जी ( निमेय ) वस्तु मिळवायची तिच्या इतकी समजली जाई. संख्याया गुणस्या निमाने मयट् ( ५. २. ४७. ) हे सूत्र वस्तुविनिमयाचे प्रमाण दाखवणाऱ्या व्याकरण प्रयोगाचे– एका वस्तूचा एक भाग दुसऱ्या वस्तूच्या इतक्या भागाबरोबर असतो, या पद्धतीने नियमन करते. उदा. द्विमयं उदश्विद् यवानाम् "ताकाचे मूल्य जवाच्या दुप्पट आहे," म्हणजे जवाच्या दोन भागांची किंमत ताकाच्या एका भागाइतकी आहे. निमेयाच्या ( विकत घ्यायची वस्तु ) एका भागाची निमानाच्या अनेक भागांशीच तुलना केली पाहिजे. प्रमाण क्ष १ असेच असले पाहिजे, क्ष : २ वा क्ष : ३, इ० कधीही असायला नको; यात 'क्ष' निमानाचा निदर्शक आहे.'[१५३]

वस्तूचा भाव करणे ही खुद्द बुद्धाच्या काळातही मोठी कसबाची कामगिरी होती. तण्डुल-नालि जातकात ( ५ ) काशीच्या ब्रह्मदत्त राजापाशी 'अर्घ-कारक' ( भाव ठरवणारा ) नावाचा एक खास अधिकारी असल्याचे दाखविले आहे.[१५४] उत्पादकाला जरी त्याची वस्तु बनवायला लागणारा श्रमकाल माहित असणे स्वाभाविक होते, तरी तिचे मूल्य ती दुसऱ्या वस्तूच्या सामन्यात जी त्याला खरीदायची असते– उभी राहिल्याशिवाय समजणे शक्य

अनुक्रमणिका

नव्हते. त्याच्या वस्तूच्या भौतिक देहात असलेल्या मूल्यरूपी आत्मन्‌चा साक्षात्कार त्याला खरीदायच्या वस्तूच्या शारीरिक स्वरूपातच होऊ शकत होता. दोन क्रयवस्तूंच्या मूल्यसंबंधाची अभिव्यक्ति निमान व निमेय यांच्या व्युत्पत्तिशास्त्रीय अर्थात स्पष्टपणे होते. निमान म्हणजे जिचे मूल्य मापायचे आहे अशी वस्तु व निमेय म्हणजे जी निमान-वस्तूचे मूल्य मापते अशी वस्तु. मार्क्स निमानवस्तूची व्याख्या सापेक्ष-मूल्य, म्हणजे जिची, मूल्य-प्रसूती दुसऱ्या वस्तूच्या संबंधाची अपेक्षा ठेवते, अशी करतो, म्हणून या आर्थिक विवाहात ती प्रकृतीची प्रसवधर्मी व कर्तृभावी ( active ) भूमिका बजावते तर निमेय वस्तूची व्याख्या तो सम-मूल्य, म्हणजे निमान-वस्तूच्या मूल्यात्म्याचा स्वदेहरूपात साक्षात्कार करणारी, अशी करतो. निमेय-पदार्थ मूल्यप्रसूतीला केवळ निमित्तमात्र, 'जनक' ( begetter ) असल्यामुळे तो या आर्थिक विवाहात अ-प्रसवधर्मी व अकर्तृभावी ( passive ) उदासीन पुरुषाची भूमिका बजावतो.

गुणनिदर्शक मयट् प्रत्ययाचा संदर्भ जास्त स्पष्ट व्हावा म्हणून आपल्याला निमान-व्यवहाराच्या ऐतिहासिक स्वरूपाचा परामर्श घेतला पाहिजे. महाराष्ट्रातल्या आदिवासी बाया अजूनही आपल्या 'क्रयवस्तु' विकायला त्या वस्तूंचे छोटे छोटे भुगले करून बसतात, ज्यांना त्या 'वाटे' म्हणतात. वाटा शब्दाचाही अर्थ भाग असा होतो. प्रकरण ४ च्या अंती सांगितल्याप्रमाणे कुंती तिच्या पाच पुत्रांनी आणलेल्या सबंध दैनिक भिक्षेचे प्रथम सारखे दोन भाग करी, आणि एक भाग भीमाला देऊन दुसऱ्या भागाचे स्वत:साठी व बाकी चार पुत्रांसाठी पाच पोटभाग करी. अशा प्रकारे येथे प्रमाण होते ५:१. द्रौपदीची भर पडल्यानंतर हे प्रमाण झाले ६:१ ! कुंतीने नववधू द्रौपदीला आज्ञापिले की, देवांना बलि, ब्राह्मण व याचकांना भिक्षा दिल्यानंतर –

" ततश् च शेषं प्रविभज्य शीघ्र–
मर्धं चतुर्धा मम आत्मनश् च ॥ ५ ॥
अर्धं तु भीमाय च देहि भद्रे ! " ( १.१९१.६ )

[ " मग शेष ( भिक्षेचे ) लगेच सारखे दोन भाग करून अर्ध्याचे माझ्या चार पुत्रांचे चार, माझा व तुझा मिळून सहा भाग कर, आणि भद्रे, अर्धा भीमाला दे ! " ]

या भुकेच्या मूल्यसंबंधाचे भीमपक्षीय टोक अखंड एक रहाते, तर प्रतिपक्षीय टोक पाचाकडून सहाकडे हेलकावा घेते. प्रत्यक्ष निमानात मूल्यसंबंध खालीलप्रमाणे राहतात –

अनुक्रमणिका

| सापेक्ष ( कर्तृ ) मूल्यरूप | | सम ( उदासीन ) मूल्यरूप |
|---|---|---|
| २ वा ३ वा ४ इ. जव–वाटे ( गुण ) | : | १ दही–वाटा |
| द्विमया यवा | | उदश्वितः। |
| निमान–वस्तूचे २ वा ३ वा ४ इ. भाग | : | निमेय–पदार्थाचा एक भाग |

राजसूयातही मानवगणातर्फे राजा व देवगणातर्फे देवराज इंद्र यांच्यात निमान होते –

'शतक्रतो, क्रयवस्तूंप्रमाणे ( वस्न इव ) आपण हविर्अन्नाच्या बदल्यात शक्तीचे निमान ( क्रीणावहा ) करू या.

तू मला दे; मी तुला देईन; '[१५५]

पण आद्य यज्ञनिमान द्यावा–पृथिवीतले होते–

'...... पञ्चविंश ब्राह्मण ७.१०.३ व जैमिनीय ब्राह्मण १.१४५ सांगतात की, द्यावापृथिवीच्या वियोगामुळे "देव व माणसे भुकेली झाली (अशनयन्); कारण देव येथून जे दिले जाते त्यावर जगतात व माणसे तेथून जे दिले जाते त्यावर जगतात 'आपण विवाहबद्ध होऊ या' (विवहावहै), असे ते म्हणाले ... त्या लोकाने या लोकाला विवाहवर म्हणून उषा दिली व या लोकाने (उषःकालीन यज्ञाचा) धूर; त्या लोकाने या लोकाला विवाहवर म्हणून पर्जन्य दिला व यालोकाने त्या लोकाला देवयजन." ......'[१५६]

दोन पक्ष व वर्गांच्या मायिक समागमासह भूमाता व चंद्रदेव यांचे प्रतिनिधित्व करणाऱ्या गणमाता व नियतकालिक ब्रह्मन् यांचा देवविवाह यांचे दोन गणामधील निमानाद्वारा मानवगण व देवगण यांच्यामधील यज्ञनिमानाचे बहिर्गतीकरण होते.

जेव्हा एखादा गण एखादी वस्तु मोठ्या प्रमाणात बनवीत राहिल्याने तिच्या उत्पादनाचे कसब कमवतो व अशाप्रकारे तो तिची आकस्मिक देवघेव करण्याऐवजी नियमित देवघेव करू लागतो, तेव्हा आपले मूल्य प्रतिबिंबित करायचा तिचा परीघ एखाद्याच निमेय–वस्तूपुरता मर्यादित न राहाता अनेक निमेयवस्तूपर्यंत विस्तारत जातो. विविध क्रय ( पण्य ) वस्तूनी प्राप्त केलेल्या या विस्तारित मूल्यरूपाची अत्यंत दक्षपणे नोंद भारतीय वैयाकरणांनी घेतलेली आहे–

अनुक्रमणिका

| पाणिनीय सूत्र | भाष्य | निमान पण्यवस्तु | निमेय पण्यवस्तु |
|---|---|---|---|
| ४.१.२२, ५.१.३, ६.२.४२, | काशिका | पण्य-कम्बल, वा कम्बल्य (लोकरीचे एक माप) | खरीदलेल्या पण्यवस्तु-द्वि-कम्बल्या, त्रि कम्बल्या इ. (इतक्या कांबळांनी खरीदलेली) |
| १.२.५० | ,, | सूचि ( सुई ) | खरीदलेल्या पण्यवस्तु- पञ्च-सूचिः, दश–सूचिः, इ. |
| ४.१.३६ | महाभाष्य | धीवरी माशाची टोपली, वा मासे मारायची बरची | खरीदलेल्या पण्यवस्तु- पञ्च-धीवा, दश–धीवा, इ. |
| ५.१.२७ | काशिका | वसन ( वस्त्र ) | खरीदलेली पण्यवस्तु– वासन. |
| ५.१.२६ | ,, | शूर्प ( उपन पाटी वा दोन द्रोणाचे माप ) | खरीदलेली पण्यवस्तु– शौर्प वा शौर्पिक. |
| १.२.५० | ,, | गोणि (पोतेभर धान्य) | खरीदलेल्या पण्यवस्तु-पञ्च-गोणिः, दश–गोणिः, इ. |
| ४.१.२२ | ,, | अश्व | खरीदलेल्या पण्यवस्तु-पञ्च–अश्वा, दश–अश्वा, इ. |
| १.२.४४, | महाभाष्य | गो ( गाय वा बैल ) | खरीदलेल्या पण्यवस्तु- पञ्च-गुः, इ; |
| ५.१.१९ | काशिका | | सर्वसामान्यपणे गौ– पुच्छिकम्. |
| ४.१.२४ | ,, | पुरुष ( दास )* | खरीदलेल्या पण्यवस्तु– द्वि–पुरुषा, त्रि–पुरुषा, इ. |

* ब्राह्मण व क्षत्रियांना स्मृतींनी विशिष्ट वस्तूंचा व्यापार व तोही आपत्कालात विहित ठरवला असून याव्यतिरिक्तचा सर्व व्यापार मना केलेला आहे –

'२. अन्नाच्या बदला अन्न, दासांच्या बदला दास ( मनुष्याणां मनुष्यैः ), रसांच्या बदला रस, गंधांच्या बदला गंध व विद्येच्या बदला विद्या.

( आपस्तंब, १.७.२०.१५ ).

'३. [ ब्राह्मणांना व क्षत्रियांना ] तिळाच्या बदला तीळ, तांदुळाच्या बदला तांदूळ, पक्व अन्नाच्या बदला पक्व अन्न, विद्येच्या बदला विद्या व दासाच्या बदला दास, असे निमान विहित आहे. (वासिष्ठ, ११.३९).'[१५७]

पण गणाने आपल्या खास निमान वस्तूच्या मूल्यरूपाचा परीघ कितीही विस्तारला तरी त्याच्या आवाक्यात सर्व निमेय–पदार्थ येणे शक्य नव्हते. कारण नवनवीन निमेय–पदार्थ निमान-व्यवहारात येतच रहातात, आणि विशिष्ट आंतरगणीय निमानक्षेत्रातील काही गण पशुपालक, काही कृषक इ० असल्यामुळे एका गणाची निमान–वस्तु बाकी सर्व गणांना प्रमाणभूत होण्याची शक्यता नव्हती. तरीही, या मर्यादेत त्यासाठी एका जंगम व सहजगत्या विभाजनीय पण्यवस्तूची आवश्यकता होती. अशी पण्यवस्तु होती 'गो' ( बैल वा गाय ). सिंधु शिक्क्यावरील वशिंडाच्या भव्य बैलाचे अनन्य उत्थित-शिल्प व प्राचीन पुष्करावतीच्या ( आधुनिक चारसद्दा ) नाण्यावरील तसलाच शिक्का[१५८] निःसंदिग्धपणे दाखवतात की, नाण्यांअगोदर गाय बैल प्रमाणभूत निमान–वस्तु म्हणून प्रचलित होते.

४. २४. १० या ऋचेत ऋषि वामदेव गौतम त्याचा इंद्र दहा गाईंच्या मोबदल्यात द्यायची घोषणा करतो–

'दहा गाईंना कोण माझा इंद्र विकत घ्यायला (क्रीणाति) तयार आहे ? वृत्रसंहाराचे कार्य पूर्ण झाल्यानंतर तो मला परत करा.[१५९]

सिद्धेश्वरशास्त्री चित्राव यांच्या मते इंद्रमूर्तीचे निमान मातृदेवता इंद्राणी करू इच्छित होती[१६०] मूर्तींची गणप्रथाक जीवनात एक खास भूमिका होती. डब्ल्यू. रॉबर्टसन स्मिथ खुलसा करतात.

' . ... देवशत्रु व गणशत्रु एकच असतात; खुद्द ( बायबलच्या ) जुन्या करारातही "जेहूवाचे शत्रु" दुसरेतिसरे कोणी नसून इस्राएलचे शत्रु होते. युद्धात प्रत्येक देव त्याच्या गणजनांकरता लढतो व विजयाचे श्रेय त्याच्या मदतीला दिले जाते; चेमोश मोअबला विजय देतो व अश्शुर असीरियाला; आणि अनेकदा देवमूर्ती वा प्रतीक युद्धात सैन्याची संगत करते. जेव्हा इस्राएलच्या छावणीत नौका आणली गेली, तेव्हा फिलिस्तीन म्हणाले, "छावणीत देव आले आहेत; या महापराक्रमी देवांच्या हातून आपली कोण सुटका करू शकेल ?" ते स्वतःवरून परीक्षा करीत होते; कारण डेव्हिडने त्यांचा बालपेरझिमला पराभव केला, तेव्हा त्यांनी रणांगणात आणलेल्या त्यांच्या देवमूर्तीही युद्धलुटीत नेल्या गेल्या. जेव्हा कार्थेजियन लोक मॅसिडॉनच्या फिलिपशी त्यांनी केलेल्या तहात "युद्धमोहिमेत भाग घेणाऱ्या देवांचा" उल्लेख करतात, तेव्हा ते निःसंशयपणे युद्धकालात सेनापतीच्या तंबूजवळ ठोकलेल्या पवित्र तंबूतील देवमूर्तींचा निर्देश करतात ज्यांच्यापुढे विजयानंतर

युद्धबंद्यांचे बळी दिले जात असत. तसेच एक अरब कवी म्हणतो, "याघूतने आमच्याबरोबर मुरादविरुद्ध चाल केली;" म्हणजे, याघूत देवाची प्रतिमा युद्धात नेली गेली ..... [१६१]

अर्जुन व कर्ण यांच्यामधील अंतिम द्वंद्वयुद्धात चांद्रदेवता अर्जुनाच्या पक्षाला उभ्या राहिल्या, तर आदित्यदेवता कर्णपक्षाला (आदित्याः कर्णतोऽभवन् ॥ ८.८७.४६–४७). [१६२] पृथिवीने अर्जुनाची बाजू घेतली, तर द्यो ने कर्णाची (८.८७.३८–३९)–

द्यौर् आसीत् सूत–पुत्रस्य पक्षे माता इव अधिष्ठिता ॥
भूमिर् धनञ्जयस्य आसीन् माता इव जयकाङ्क्षिणी ।

[ द्यो (आकाश) सूतपुत्र (कर्णाच्या) पक्षाला मातृवत् उभे राहिले, तर जयकांक्षिणी भूमाता धनंजय (अर्जुनाच्या) पक्षाला उभी राहिली. ]

५.३.९९ हा पाणिनीय नियम उपजीविकेसाठी असलेल्या व विक्रयार्थ असलेल्या देवमूर्तीमध्ये फरक करतो. पुरि विवरण करतात–

' ...... (देव–) प्रतिकृती पण्य नसेल व (पुजाऱ्याच्या) उपजीविकेचे साधन असेल तेव्हा ( प्रतिकृतिवाचक शब्दाला लागणारा इव अर्थी कन् ) प्रत्ययाचा लुप् होतो, ' असा उपदेश करणाऱ्या ' जीविकार्थे चापण्ये' (५.३.९९) या सूत्रावर भाष्य करताना शिव, स्कन्द व विशाख यांच्या प्रतिकृतिवाचक शब्दांना क प्रत्यय केव्हा लागत नाही याचे पतंजलि उदाहरण देतो. हिरण्यार्थी मौर्यांनी या देवांच्या प्रतिकृती तयार करवून घेतल्या; पण हा नियम प्रतिकृतिवाचक शब्दांना तेव्हाच लागू होतो जेव्हा त्या गृहस्थांना दाखवत फिरणाऱ्या माणसाचे जीविकेचे साधन होतात. वेबरच्या मते, " पाणिनि अशा प्रतिकृतींचा निर्देश करीत आहे की ज्या उपजीविकेचे (जीविकार्थे) साधन असल्यामुळे पण्य आहेत व ज्या (विकायची प्रथा) त्याच्या दृष्टीने मौर्यकाळापासून चालत आलेली आहे " ...... [१६३]

पण, इंद्र–प्रतिकृतीच्या निमानावरून स्पष्ट होते की, स्कंद, विशाख, इ. च्या प्रतिकृतींचा विक्रय मौर्यांचा शोध नव्हता. आद्य निमानाची स्मृती द्यावा–पृथिवीच्या यज्ञ–निमानाद्वारे कशी सुरक्षित राहिलेली आहे, हे अगोदर दाखवले गेलेलेच आहे. जेव्हा या प्राथमिक निमानाचा सर्वसामान्य मूल्यरूप म्हणून 'गो' ला निवडायच्या अवस्थेपर्यंत विकास होतो. तेव्हा 'गो' चे पृथिवीशी समीकरण होते ( निघण्टु, १.१.१ ), आणि त्याबरोबर सोमाची, खुद्द चंद्रदेवाची, 'सोम–क्रयणी' नावाच्या विधीत खरेदी सुरू होते–

'......सोमराजा गंधर्वांमधे होता. देव व ऋषींनी त्यावर विचार केला, 'कसा सोमराजा आपल्याकडे येईल? ' वाक् म्हणाली,* 'गंधर्व स्त्रीकामुक असतात; स्त्री म्हणून मला देऊन त्याला निमानांत घ्या ( पणध्वम् ).' देव उत्तरले, 'नाही, कसे आम्ही तुझ्यावाचून राहू? ती उत्तरली, 'तरी निमान करा; जेव्हा तुम्हाला माझी गरज लागेल तेव्हा मी तुमच्याकडे परतेन.' ( ते उत्तरले ) 'तसेच होवो.' त्या महानग्नीच्या निमानातून त्यांनी सोम राजाला विकत घेतला ( तया महानग्न्या भूतया सोमं राजानम् अक्रीणम्। ). तिची प्रतिकृती म्हणून ते एक उत्कृष्ट तरूण गाय सोमक्रयणीसाठी आणतात. तिच्यावर ते सोम राजाला विकत घेतात. तिची ते पुन्हा खरेदी करू शकतात; कारण ( वाक् ) त्यांच्याकडे परतली ... ... '[१६४]

सोमाचे विनिमयमूल्य काय होते ? मूळ स्त्रीसत्ताक वास्तवतेनुसार राष्ट्रीदेवी अमर व पूर्ण व एक होती, तर तिचे ब्राम्हन् धर्मपती मरणधर्मा व अनेक होते. पण सामाजिक व आर्थिक वास्तवता स्त्रीसत्तेच्या फार पुढे गेलेली होती. शतपथ ब्राम्हण म्हणते.

'१. तो सोमराजाचा सौदा करतो; म्हणून प्रत्येक वस्तु येथे ऋथ्या आहे. तो म्हणतो, 'सोमविक्रेत्या, तुझा सोम राजा विकाऊ आहे ? ' सोमविक्रेता म्हणतो, 'तो विकाऊ आहे; ' 'मी त्याला तुझ्याकडून विकत घेईन ! ' सोमविक्रेता म्हणतो, ' घे विकत ! ' – ' मी तुझ्याकडून त्याला ( गाईच्या ) सोळाव्या कलेला विकत घेईन.' सोमविक्रेता म्हणतो, 'सोमराजाचे मूल्य खचितच त्यापेक्षा जास्त आहे.' अध्वर्यु म्हणतो, 'होय, सोम राजाचे मूल्य त्यापेक्षा जास्त आहे; पण गाईची थोरवी खरोखरच मोठी आहे.

' ३. ' मी त्याला तुझ्याकडून एका खुराला विकत घेईन !' ' सोमा राजाचे मूल्य खचितच त्यापेक्षा जास्त आहे; सोमविक्रेता म्हणतो. ' होय, सोम राजाचे मूल्य त्यापेक्षा जास्त आहे; पण गाईची थोरवी खरोखरच मोठी आहे, अध्वर्यु उतरतो; आणि दर वेळी तिच्या दहा गुणांचे वर्णन करून तो म्हणत जातो, ' मी त्याला तुझ्याकडून तिच्या एका पायाला विकत घेईन, ' अर्ध्या ( गाईला ), – ' ( सबंध ) गाईला ! – ' सोम राजा विकत घेतला गेला आहे ! ' ... ... '[१६५]

दोन अंतर्हित वास्तवता यातून दृग्गोचर होतात –

---

* अगोदर दाखवल्याप्रमाणे भूमतेचे एक रूप.

अनुक्रमणिका

( १ ) पुरुष केव्हाच पण्यवस्तु झालेला आहे. वाक् भूमातेचा प्रतिपक्षीय आता स्वतंत्र चंद्रदेव नसून दास सोम आहे. दासप्रथा आता प्रस्थापित सत्य झालेले आहे.

( २ ) पण वाक्‌रूपी जगन्मातेचे समीकरण आता सोमरुपी पुरुषबहुलतेशी नाही, तर पूर्ण व एका सोमाचे अनेक झालेल्या वाक्‌शी आहे. सोम आता विश्वरूप व एकमेव पुरुष झालेला आहे !

गाय येथे सोळा कलांमध्ये विभाजित केलेली आहे, आणि प्रथम $\frac{1}{16}$ ने, नंतर $\frac{1}{8}$ ने, नंतर $\frac{1}{4}$ ने. नंतर $\frac{1}{2}$ ने व शेवटी सबंध गाईने सोमाचा सौदा पटवला जातो. गाय अशा प्रकारे आर्थिक व्यवहार विभाजित केला जाऊ शकत नाही. असे अचूक अपूर्णांक मध्ये विभाजन केवळ मौल्यवान् धातूचे, पैशातील मूल्यरूपाचे होऊ शकते. संस्कृतात हिरण्यचा अर्थ कोणताही मौल्यवान धातु असा होतो.[१६६] निघण्टु ( १. २. २. ) हिरण्य शब्दाचा एक पर्यायवाची शब्द चन्द्र असल्याचे सांगतो. पुरुष सोम आता वैश्विक साम्यदर्शक झालेला आहे, पण्यवस्तुविश्वाच्या मूल्यांचा आरसा.

हिरण्याच्या या सोळा भागातील वैशिष्टयपूर्ण विभाजनाचा प्राचीन भारतीय नाण्याशी काहीतरी संबंध दिसतो. सिंधु समाजाच्या तथाकथित व्यापारी वर्णाचा वाचक असलेल्या पणि शब्दाचा व्युत्पत्तिशास्त्रीय इतिहास सांगताना कोसंबी सांगतात की, प्राचीनतम भारतीय नाण्यांचे वजनमान मोहेंजोदारोच्या वजनमानाशी हुबेहूब जुळते –

'...... भारतीय नाण्यांचे प्राचीनतम वजनमान इराण व मेसोपोटामियात प्रचलित असलेल्या वजनमानाशी जुळत नसून मोहेंजोदारोच्या विशिष्ट प्रकारच्या वजनांशी हुबेहूब जुळते ......'[१६७]

सिंधुयुगोत्तर नाण्याचा उदय इसवीपूर्व सातव्या शतकात झालेला असला, तरी त्याच्या वजनमानाचा माग थेट सिंधुसंस्कृतीपर्यंत जातो –

'सापडलेल्या नाण्यांवरून नियमित स्वरूपातील मुद्रांकन ( इसवीपूर्व ) सातव्या शतकाच्या अखेरीस प्रचलित झाले असावे असे दिसते. चांदीच्या नाण्यांचे पूर्वभारतीय वजनमान मगधाच्या ३·५ ग्रॅम वजनाच्या कार्षापणाचे होते, तर एकाकी कोसल ठेव्याचे वजनमान ३/४ कार्षापण असल्याचे दिसते या वजनाचा माग सिंधु संस्कृतीपर्यंत जातो. जिने अगदी याच परिमाणाची दगडाची वजने बनविली होती. तक्षशीलेच्या नाण्याचा लागाबांधा ११ ग्रॅम पेक्षा किंचित जास्त असलेल्या परदेशी वजनमानाशी होता, जे ऐतिहासिक काळातील भारतीय रुप-

याशी ठोकळपणे जुळते मिळते होते. कार्षापण ३२ युनिट वजनाचा होता, तर वायव्य सरहद्दीवरील वाकवलेल्या पट्टीसारखे नाणे १०० युनिट वजनाचे होते. मुळात खुद्द व्यापारीच बिनशिक्याची नाणी पाडून प्रसृत करीत व ती अभिसरणात असताना व्यापाऱ्यांच्या श्रेणी त्यांची वजने तपाशीत. ही तपासणी त्यांच्या एका बाजूवर अंकित केलेल्या बारीक खुणा दाखवीत. श्रेणींची सांकेतिक चिन्हे जाणणाऱ्यांना त्यावरून नाण्याच्या वजन व शुद्धतेबद्दल खात्री पटे. काही आहत चिन्हे खुद्द सिंधु चित्रलिपीपासून घेतलेली होती, बहुधा पर्णींच्या वंशजांद्वारा ......'[१६८]

बुद्धकालात मागध कार्षापण ४ पादांचा ( पाद म्हणजे $\frac{1}{4}$ वा पावली ) होता व पाद ५ माषांचा ( तेन खो पन समयेन राजगहे पञ्च-मासको पादो होती। ).[१६९] पण पतंजलीने १. २. ६४ या पाणिनीय सूत्रावर भाष्य करताना प्राचीन काळात कार्षापण १६ माषांचा होता ( पुराकल्प एतद् आसीत् षोडश -माषः कार्षापणम् । ) असे नमूद करून एक प्राचीन परंपरा जतन केलेली आहे. वासुदेव शरण अग्रवाल विवरण करतात–

'कार्षापण हे एका आहतचिन्हांकित चांदीच्या नाण्याचे नाव होते, ज्याचे अनेक ठेवे भारताच्या निरनिराळ्या भागात सापडलेले आहेत. सुमारे इसवी पूर्व सहाव्या शतकानंतर ते विनिमयाचे प्रमाणभूत माध्यम बनले. आताच्या रुपया-प्रमाणेच त्याचे भाग होते. $\frac{1}{2}$ ला अर्ध ( ५. १. ४८, अर्ध-शब्दो रूपकार्धस्य रूढिः। काशिका) व भाग (५. १. ४९, भाग– शब्दोऽपि रूपकार्धस्य वाचकः। ) म्हणत, $\frac{1}{4}$ ला पाद ( ५. १. ३४ ) व $\frac{1}{16}$ ला माष ( ५.१. ३४ ), असा पाणिनि उल्लेख करतो.[१७०]

कार्षापण १६ च माषांचा का होता? माष म्हणजे एक प्रकारचा घेवडा. १.२.६४ या पाणिनीय सूत्रावर भाष्य करताना पतंजलि म्हणतो की घेवड्याच्या प्रत्येक शेंगेत १६ दाणे असतात ( ... षोडश–फलाश्च माष– शंवत्यः । ). पण हा नंतरचा विचार दिसतो. कर्ष म्हणजे बेहड्याचे झाड. त्याच्या फळाला विभीतक ( बिब्बा ) म्हणत व त्याचा उपयोग अक्ष ( फासे ) करण्याकडे होई.[१७१] अक्ष व सोम पर्यायवाची होते, हे अगोदर दाखवले गेलेलेच आहे. प्राचीन भारतीयाचा असा विश्वास होता की, चंद्राच्या कला सोळा असतात. पण पक्ष १५ तिथीचा बनलेला असता चंद्र सोळा कलांचा कसा असू शकतो? कल्पनेचे विवरण छांदोग्य उपनिषदात ( ६.७ ) उद्दालक आरुणि त्याचा पुत्र श्वेतकेतु याला तत्वज्ञानाचा उपदेश करताना करतो –

'१. 'सोम्य ! पुरुष सोळा कलायुक्त आहे; पंधरा दिवस जेवण करू नकोस; मात्र यथेच्छ पाणी पी. प्राण जलमय आहे; म्हणून पाणी प्याल्याने प्राणोत्क्रमण होत नाही.'

'२. त्याने ( श्वेतकेतूने ) पंधरा दिवस जेवण केले नाही. नंतर तो त्याच्या जवळ आला व म्हणाला, 'काय बोलू , भो ?'

'सोम्य, ऋचा व साम ( म्हण ).'

तेव्हा तो म्हणाला, 'मला खरोखर ते ( मंत्र ) दिसत नाहीत, भो !'

'३. त्यावर तो म्हणाला, 'सोम्य, बरीच लाकडे लावून पेटवलेल्या मोठ्या अग्नीचा काजव्या एवढा निखारा उरला म्हणजे जसा त्याचा दाह क्षीण होतो, त्याप्रमाणे सोम्य, तुझ्या सोळा कलांपैकी केवळ एकच कला उरलेली आहे; म्हणून तुला वेदांचा अनुभव होत नाही. जेव; मग तू माझे म्हणणे समजू शकशील.'

'मग तो जेवला व त्याच्यापाशी आला. नंतर त्याला जे विचारले गेले ते त्याने सर्व सांगितले. मग तो त्याला म्हणाला:-

'५. 'सोम्य, बरीच लाकडे लावून पेटवलेल्या मोठ्या अग्नीतून काजव्या एवढा निखारामात्र उरल्या नंतर त्याच्यावर ( कोरडे ) गवत टाकून प्रज्वलित केल्यास त्याच्या परिमाणापेक्षा जास्त दाह करतो- [ ६ ] त्याप्रमाणे, सोम्य, तुझ्या सोळा कलांपैकी एकच कला राहिलेली होती. तिच्यावर अन्न टाकताच ती प्रदीप्त झाली. तिच्यानेच तू आता वेदांचा अनुभव करीत आहेस; ...'[१७२]

शंकराचार्य या रूपकाचा खुलासा पुढीलप्रमाणे करतात- 'पंधरा दिवस जेवण न केल्याने कृष्णपक्षीय चंद्राप्रमाणे एकेका दिवशी तुझी एकेक कला क्षीण होत गेली. ती उरलेली एक कला अन्नसेवनातून उपसमाहित, वर्धित, पुष्ट झाली व प्रदीप्त होऊन उठली. ( पञ्चदश-अहान्य् अभुक्तवत एक-एके अह्नि एक-एका कला चन्द्रमस इव अपर-पक्षे क्षीणा, सा अतिशिष्टा कला तव अन्नेन भुक्तेन उपसमाहिता, वर्धिता, प्राज्वाली । ).

गण व निसर्गाचे पुनरुत्पादन करण्यासाठी पुरुषसूक्ताद्वारे नियतकाली बळी दिला जाणारा पुरुष ब्रह्मन् त्याच्या पाव भागाने मर्त्यांच्या जगाची पुनरुत्पत्ती करतो व बाकी पाऊण भागाने स्वर्गाची करतो, असे मानले जाई. शतपथ ब्राह्मण म्हणते- '...... येथे सर्व सोळा कलांचे बनलेले आहे, आणि पुरुषमेध म्हणजे सर्व काही आहे ......'[१७३] पुरुषसूक्त १६ ऋचांचे

बनलेले आहे. म्हणून, सिंधु राज्याची मुद्रावली (coinage) चंद्रदेवाच्या सोळा कलांवर व त्याचा मानवी प्रतिनिधी असलेल्या पुरुष ब्रह्मन्‌चे चार तुकडे करण्यावर आधारली होती.

प्राचीन मुद्रावलीचा चंद्राशी घनिष्ट संबंध होता. मौर्यांची नाणी त्यांच्या साम्राज्यचिन्हाने कमानीवरील चंद्रकोरीने, अंकित होती. कोसंबीच्या मते कमान आकाशाची निदर्शक असावी; [१४७] पण ती मंदिराचीही निदर्शक असू शकते. एका प्राचीन सेमेटिक नाण्यावर पॅफॉसचे मंदिर व त्यावर चंद्र अंकित केलेला आहे. [१७५] या नाण्यावरील चंद्राची आकृती चंद्रकोरीत पूर्णचंद्र अशी आहे. पांझरा व तिच्या उपनद्यांच्या खोऱ्यात, विशेषतः साक्री, नंदुरबार व धुळे तालुक्यात, विखुरलेल्या वीर, सती व यज्ञ यांच्या स्तंभांवर हीच वैशिष्टयपूर्ण चंद्राकृती कोरलेली आहे.

सिंधुमुद्रावलीची ही वैशिष्टये केरळीय मुद्रावलीने आतापर्यंत टिकवुन ठेवली होती. प्रथम सोन्याचा व नंतर चांदीचा फनम् ( संस्कृत पण ) केरळात इ. स. १८६२ पर्यंत प्रचलित होता. एक चक्रम् सोळा तांब्याच्या काशांचा असे व एक फनम् चार चक्रम्‌चा. प्राचीनतम सुवर्णफनम्‌ला राशी म्हणत व तो परशुरामाने प्रचलित केला असे मानले जाई –

' राशी– फनम् सोन्याचा होता व त्यावर १४ ठिपके होते. राशीचा अर्थ होतो ज्योतिःशास्त्रातील झोडिआकचे चिन्ह. असे मानले जाते की, हे बारा ठिपके म्हणजे बारा राशी असून वेगळे दोन ठिपके सूर्य व चंद्राचे वाचक आहेत ... ' [१७६]

उद्धृत केलेला शतपथ ब्राह्मणातील सोमक्रयणी विधी सोमक्रयणी गाईचे दहा गुण निवेदित करतो. ही गाय भूमातेचे प्रतिनिधित्व करते हेही वाखवलेलेच आहे. भूमातेची मानवी प्रतिनिधी असलेल्या गणमातेला राट् वा राष्ट्री म्हणत. छांदोग्य उपनिषदात ( ४ ३. ८ ) विराट् दहा देवतांची बनलेली आहे, असे सांगितले आहे. एक उपनिषदीय तत्त्वज्ञानी सयुग्वा रैक्व या दहा देवतांची पांचांपाचाच्या दोन संवर्गात * मांडणी करतो ( ४. ३. १– ४ )–

– देवांचा संवर्ग –

(१) अधिदैवत वायु, (२) अग्नि (३) सूर्य (४) चंद्र, व (५) अप्,

* सम्+वर्ग. हा संवर्ग आपल्याला प्रकरण १ मधील वैश्विक पक्ष वर्गाकडे व मानवी गणार्धाकडे घेऊन जातो.

इंद्रियांचा संवर्ग ( आध्यात्मिक )–

(१) अधिदैवत प्राण, (२) वाक्, (३) चक्षू, (४) श्रोत्र, व (५) मन.

विराट्‌ची कृतशी, द्यूतातील विजयी डावाशी, तुलना केलेली आहे. कृत जरी चार संख्येचा निदर्शक असला, तरी तो स्वतःत इतर सर्व खालच्या डावांचे संवर्गीकरण करतो त्रेता म्हणजे ३, द्वापर म्हणजे २ व कलि म्हणजे १. यांची बेरीज केली ( ४ + ३ + २ + १ ) म्हणजे आपल्याला १० हा आकडा मिळतो. अशा प्रकारे कृत हा दशसंख्यावाचकही आहे. कृत हा शब्द कटचा पर्यायवाची आहे. कटचा अर्थ देवस्थान क्षेत्र असाही होतो. म्हणून, विराट्‌ची व्युत्पत्ती व तिचा कटक्षेत्राशी संबंध यावरून ती भूमाता असल्याचे सिद्ध होते. हेच उपनिषद् ( ४. ३. ८ ) पुढे म्हणते की, विराट् ही अन्न आहे व अन्न खाणारी आहे. विराट् वा विराज् हा छन्द दहा अक्षरांचा आहे. विराट् म्हणजे मूल जड ( primary matter ), प्रकृतीची पर्यायवाची.[१७७]

छांदोग्य उपनिषद्‌च्या अध्याय ४, खंड ४ ची प्रस्तावना करताना शंकराचार्य लिहितात की, अन्न व त्याचे दहा भक्षक यांच्या जगताचे मूल कारणात एकीकरण करून पुन्हा त्याचे सोळा भाग करून ब्रह्मवादाचे विवरण केले जाते. सांख्याची महाभारतीय आवृत्ती[१] विश्वसर्जनाचे खालीलप्रमाणे वर्णन करते ( १४. ४०. ९–१० ).

अहङ्कारात् प्रसूतानि महाभूतानि पञ्च वै ।
पृथिवी वायुर् आकाशम् आपो ज्योतिश् च पञ्चमम् ॥

[ पृथ्वी, वायु, आकाश, अप् व पाचवे तेज ही पाच महाभूते अहंकारापासून उत्पन्न होतात. ]

तेषु भूतानि युज्यन्ते महाभूतेषु पञ्चसु ।
ते शब्द-स्पर्श-रूपेषु रस-गन्ध-क्रियासु च ॥

[ या पाच महाभूतांनी व त्यांची कार्ये असलेल्या शब्द, स्पर्श, रूप, रस व गन्ध यांनी सर्व प्राणीमात्र बनलेले आहेत. ]

या दहा पदार्थांचे एकीकरण करून वैराटी पुरुष निर्माण होतो आणि त्याचा पुरुषमेधात वध करून व त्याचे सोळा तुकडे करून विश्वाचे पुनरुत्पादन होते. सांख्यकारिका पाच तन्मात्रे व अकरा इंद्रिये ( पाच ज्ञानेंद्रिये, पाच कर्मेंद्रिये व मन ) मिळून सोळांचा गण बनवते. सर्व प्राणीमात्र या षोडशगणांचे बनलेले असल्याचे मानले जाते. महाभारताच्या खालील श्लोकांनी ते स्पष्ट होईल ( १४. ११. ७–१९ ) –

अनुक्रमणिका

१. सांख्यकारिका ( कारिका २२ ) पंचमहाभूते पंचतन्मात्रापासून उत्पन्न झाले असल्याचे दाखवून सृष्टिक्रम उलट करते.

वृत्रेण पृथिवी व्याप्ता पुरा किल नराधिप ।
दृष्ट्वा स पृथिवीं व्याप्तां गन्धस्य विषये हृते ॥

[ नराधिपा ! पूर्वी वृत्राने ही पृथ्वी व्यापली. पृथ्वी व्यापलेली व तिचा गुणधर्म असलेल्या गंधाचे हरण झालेले पाहून– ]

संतापलेल्या इंद्राने वज्राने त्याला तेथून मारून काढले–

विवेश सहसा तोयं जग्राह विषयं ततः ।
अप्सु वृत्र-गृहीतासु रसे च विषये हृते ॥

[ ( वृत्राने मग ) सहसा पाण्यात प्रवेश करून त्याच्या गुणधर्माचे हरण केले. वृत्राने पाण्याचे ग्रहण करून ( सपाटून ) त्याचा गुणधर्म असलेल्या रसाचे हरण केलेले पाहून– ]

इंद्राने त्याला तेथून मारून काढले. अशा प्रकारे वृत्र क्रमाक्रमाने तेज, वायु व आकाशात शिरला आणि त्याने त्यांचे अनुक्रमे रूप ( रंग ), स्पर्श व शब्द ( आवाज ) या गुणधर्मांचे हरण केले. इंद्राने त्याला तेथूनही मारून काढले. शेवटी वृत्राने खुद्द इंद्रातच प्रवेश केला व त्याला ग्रासले. ५.२.९३ या पाणिनीय सूत्रानुसार इंद्रिय हा शब्द इन्द्र या शब्दापासून बनलेला आहे.[१७८] म्हणून, ‘इंद्रात प्रवेश करून त्याचा विषय ग्रासणे,’ याचा अर्थ होतो अकरा इंद्रियांना ग्रासणे. कथेचा शेवट इंद्राने वृत्राला या इंद्रियामधून मारून काढण्यात होतो. अशा प्रकारे वृत्र वा पुरुष ब्रह्मन् या षोडश गणाचा बनलेला होता व त्याला विधिपूर्वक मारून विश्वाचे पुनरुत्पादन होत असे.

पुरुषसूक्ताचा प्रारंभ पुरुषाचे वर्णन सहस्रशीर्ष, सहस्राक्ष व सहस्रपात असे करणाऱ्या ऋचेने होतो. गणदासप्रथेच्या उदयाबरोबर मध्ये पुरुषाच्या या मायिक कल्पनेचे रूपांतर आर्थिक व्यवहारात होते. जेव्हा भृगुगोत्रीय ब्रह्मन् च्यवन त्याला गंगेतून माशांसह जाळ्याने ओढून काढणाऱ्या कोळ्यांपासून विकत घेण्याबद्दल नहुष राजाला सांगतो, तेव्हा राजा ब्रह्मन्चे मूल्य म्हणून १००० नाणी ( बहुधा कार्षापण ) कोळ्यांना द्यायचा पुरोहिताला आदेश देतो.[१७९] एका राजपुत्राचे मूल्य १००० निष्क असल्याचे वेस्संतर जातक सांगते यावरून दासाची ही कमाल किंमत होती असे दिसते. पूजक ब्राह्मणापासून कितीला विकत घ्यावे, असे पूजकाचा दास झालेल्या आपल्या नातूला, जालीला, शिबींचा राजा संजय विचारतो, तेव्हा तो राजपुत्र उत्तरतो की, त्याच्या

पित्याने, वेस्संतरने, त्याची किंमत १००० निक्क ठरवलेली आहे ( " सहस्स-अग्घ हि मं तात ब्राह्मणस्य पिता अदा । " ) .१८०.

वरुणाला नरबळी देण्यासाठी ब्रह्मन् विकत घ्यायचा आद्यतम उल्लेख ऐतरेय ब्राह्मण ( ७. १४ ) करते. इक्ष्वाकूंच्या राजपुत्र रोहिताला त्याच्या ऐवजी वरुणाला बळी देण्यासाठी मध्यपशु पाहिजे होता. त्याने शुनःशेप आजीगर्तीला शंभर गाईंना विकत घेतला. एका बैलजोडीची किंमत चोवीस कार्षापण असल्याचे गामणी-चण्ड जातक ( २५७ ) सांगते. १८१ गाईची सरासरी किंमत दहा कार्षापण असावी; म्हणून, शंभर गाउ म्हणजे १००० कार्षापण इतकी ब्रह्मन् मेध्यपशूची कर्मकांडी किंमत असावी.

सत्तु-भस्त जातकानुसार ( ४०२ ) बुद्धपूर्वकालात दास वा दासीची सरासरी किंमत ७०० कार्षापण असावी असे दिसते.

' ... घरचे कामकाज होत नाही असे सोंग करून एक ब्राह्मणी तिच्या नवऱ्याला भिक्षा मागून दासी विकत घेण्याइतके पैसे आणायला सांगते. ब्राह्मण भिक्षा मागून ७०० कहापण– त्याच्या मते दास वा दासी विकत घ्यायला पुरेसे– गोळा करतो (अलं मे एत्तकं धनं दासीदासमूलाय । ३. ३४३) ...'[१७२]

चानना सार काढतात–

'पालि साहित्यानुसार दास वा दासीची खरेदी शंभर नाण्यांना होऊ शके. परंतु हा एकच भाव नसून अनेक भावांपैकी एक असावा. कारण बाजारावर नियंत्रण असू शकत नव्हते आणि युद्ध, विक्रयार्थ उभ्या केलेल्या व्यक्तींचे वय, प्रकृती, लिंग, इ. बाबींचा भावपातळीवर परिणाम होऊ शकत होता ... इतरत्र सातशे नाण्यांच्या किंमतीचा उल्लेख आलेला आहे, पण दासांच्या संख्येचा खुलासा केलेला नाही. दासाची सरासरी किंमत शंभर नाणी असल्याचे आपण मान्य केले, तर ही रक्कम सात दास विकत घ्यायला पुरेशी होती. पण निश्चित माहितीच्या अभावी या रकमेचा दासांच्या ठराविक संख्येशी संबंध जोडणे संयुक्तिक होणार नाही. अर्थातच श्रीमंत माणसाला पटलेल्या दास, दासी वा दासबालकासाठी वाटेल ती किंमत, दुप्पटही, मोजण्यापासून त्याला कोणीही परावृत्त करू शकत नव्हते.

'बुद्धघोस आपल्याला दासाची किंमत पन्नास ते साठ नाणी असल्याचे सांगतो. हे नंतरचे ( खुद्द बुद्धघोसाच्याच काळातले ) उद्धरण असू शकते. तसे नसेल तर मग हे तिसरे उदाहरण आहे. ( 'कामाला भरभक्कम असलेल्या'

गाढवाची किंमत आठ कहापण होती हे आपण लक्षात घेतले पाहिजे ). येथे हे नमूद करायला हरकत नाही की, दोन राजपुत्रांना अदास करण्यासाठी ठरवून दिलेली किंमत मुलासाठी हजार निक्क व मुलीसाठी वस्तुरूपात सातशे काल्पनिक वाटते.' [१८३]

मृच्छकटिक नाटकात (अंक ८) संवाहक वसंतसेनेला आठवण करून देतो की, तो तोच आहे, की ज्याला तिने दहा सुवर्णांना विकत घेतले होते. सुवर्णाचे विनिमयमूल्य ४८ रजत कार्षापणांइतके होते.[१८४] म्हणून, मध्ययुगीन भारतात दासांची सरासरी किंमत ४८० कार्षापण असावी.

दासांच्या खरेदी विक्री बाबत केरळात कोणती परिस्थिती व प्रथा प्रचलित होत्या याबद्दल पद्मनाभ मेनन खालील प्रमाणे माहिती देतात –

'... मलबारमधील भूस्वामी त्याच्या भूदासांना जमिनीसह वा जमिनी-शिवाय केव्हाही विकू शकत होता; पण त्यांना त्यांच्या घरादारांपासून (तोडून) दूर रवाना करायचे कृत्य क्रूर व असमर्थनीय मानले गेले असते, आणि दासांनी पळून जायला पुरेसे काय पण पळून जायचे समर्थन करण्याजोगे काही बाबतीतच दासांच्या बायका दुसऱ्या स्वामीला विकल्या जाऊ शकत, आणि सर्व सामान्यपणे बोलायचे तर मातापित्यांची त्यांच्या पोराबाळांपासून ताटातूट केली जात नसे. ते भाडयाने दिले जाऊ शकत वा विशिष्ट शर्तीवर गहाण ठेवले जाऊ शकत; मलबार ईस्ट इंडिया कंपनीच्या अमलाखाली आल्यानंतरही दास हे बाजारात विकण्याजोगी वस्तूच राहिले. ते शेतसारावसुलीसाठी व कर्जापोटी विकले जात. १५ नोव्हेंबर १८३६ ला सरकारने कलेक्टरच्या खात्यावरील ९२७ रु. १३ आणे माफ केले, जे मलबारमधील सरकारी जमिनीवरील दासांचा "वार्षिक महसूल" होता.' * [१८५]

एका जमिनीच्या, त्यावर काम करणाऱ्या दासांसह, खरेदी खताचे उदाहरण मेननंनी दिले आहे–

'दासांचे एका स्वामीकडून दुसऱ्याकडे हस्तांतर करण्याच्या दृष्टीने खालील हस्तऐवज कुतूहलजनक दिसेल, कोचीनच्या राजाच्या थिथ्यूरम्चा ( राजाज्ञापत्र ) अनुवाद– "आमच्या अय्यनट्ट कृष्णन् यास या अन्वये तुला

* हीनतम जातीच्या ( पुलया ) दासचा सरासरी वार्षिक खंड २½ फनम् ( ११ आणे १० पै ) गृहित धरला, तर या सरकारी जमिनीवर राबणाऱ्या दासांची संख्या ६९४ असावी असे दिसते.

कायम अनुभोगम् शर्तीने खालील जमीनजुमला, इ. धारण करायचा व उपभोग घ्यायचा अधिकार देण्यात येत आहे : ×× इट्टिपॅगन् व कुरुंब यांचा मुलगा चाट्टन् या दासांचे स्वामित्व ×× ता० चिरक्कल कोविलकन्, ...... ( इ. स. १७९२ ). हस्ताक्षरचे रुपरम्पट्टचे ×× " ' १८६

दासांच्या किमती व त्यांचे भाडे याबद्दलचा तपशीलवार वृत्तांत मेनननी दिलेला आहे–

बर्टनच्या म्हणण्याप्रमाणे दासांच्या किंमती ३ पौंड ते ८ पौंड या दरम्यान वाढत घटत असत. कालिकतचा न्यायाधीश श्री. इ. बी. थॉमस २४ नोव्हेंबर १८४१ ता. ला सदर अदालतला लिहिताना म्हणतो की, १० वर्षापेक्षा कमी वयाच्या दासाची सरासरी किंमत ३ पौंड ८ शिलिंग होती व दासीची त्यापेक्षा थोडी कमी. पण काही तालुक्यांमध्ये दासांची पैदास करण्यासाठी दासी जास्त भाव मिळून देत. १० ऑगस्ट १८४१ ता. ला कोर्टाने केलेल्या लिलावात आई वेगळ्या केलेल्या दहा महिन्याच्या अर्भकाला १ रु. १० आण्याला विकण्यात आले. नुकत्याच झालेल्या एका दाव्यात २७ दास हे " फिर्यादीचे एकमेव कारण होते व तिचा फैसला रीतसर केला गेला. " कमिशनर ग्रेएमने उद्धृत केलेल्या श्री जेम्स व्हॉगनच्या अहवालानुसार ...... उच्चतम जातीचा दास मिळून देऊ शकत असलेली जास्तीत जास्त किंमत म्हणजे २५० जुने सुवर्णफनम् ( पौंड ५ शिलिंग ) व जास्तीतजास्त भाडे म्हणजे वर्षाला ७½ फनम् ( ३ शिलिंग ९ पेन्स् ); पण सर्व जातींच्या ( श्री. व्हॉगनअनुसार २० जाती ) दासांचा विक्रीचा सरासरी भाव १३२ जुने सुवर्णफनम् ( ३ पौंड ६ शिलिंग ) असून सरासरी वार्षिक भाडे ५ फनम् ( २ शिलिंग ६ पेन्स् ) आहे, तर दास लोकसंख्येचा निम्मावर भाग असलेल्या 'हीन पुलयर चेरमरांच्या' किंमती इतर हीनतम जातींच्या दासांपेक्षाही कमी आहेत– पुरुषाची ४८ फनम् ( १ पौंड ४ शिलिंग ), स्त्रीची ३६ फनम् ( १५ शिलिंग ), मुलाची २० फनम् ( १० शिलिंग ) व मुलीची १५ फनम् ( ७ शिलिंग ६ पेन्स् ); पुरुष व स्त्रीचे वार्षिक भाडे २½ फनम् ( १ शिलिंग ) आहे. जॉर्ज माथन लिहितो की, दास्यमुक्तीच्या कायद्याअगोदर त्रावणकोरमध्ये दासाची सरासरी किंमत ६ रु. होती, तर मलपेल्लीत १८ रु. ' १८७

—अपूर्ण







## संदर्भ टीपा—

१५२. कार्ल मार्क्स, कॅपिटल, खंड १ पा. ४८–७०.
१५३. वा. श. अग्रवाल, उक्त, पा. २४८.
१५४. जातक ( हिंदी ), खंड १, पा. २०७–२०९; पहा सुहनु जातक, खंड, २, पा. १९६–१९८.
१५५. ए. बी. कीथ, उक्त, खंड १८, पा. ११६; वाजसेनीय संहिता, ३-४९–५०.
१५६. ए. के. कुमारस्वामी, स्पिरिच्युअल, ॲथॉरिटी अँड टेंपोरल पॉवर इन द इंडियन थिअरी ऑफ गव्हर्मेंट, पा. ६७–६८.
१५७. देव राज चानना, उक्त, पा. १२०, १२२.
१५८. दा. ध. कोसंबी, उक्त, पा. १३४, चित्रे ५७–५८.
१५९. आर. ग्रिफथ, उक्त, पा. ४९७.
१६०. सिद्धेश्वरशास्त्री चित्राव, ऋग्वेदाचे मराठी भाषांतर, पा. २९२.
१६१. डब्ल्यू. रॉबर्टसन स्मिथ, रिलिजन ऑफ द सोमाइट्स, पा. ३६–३७.
१६२. वा. श. अग्रवाल, उक्त, पा. ४३१.
१६३. बलिनाथ पुरि, उक्त, पा. १०.
१६४. ए. बी. कीथ, ऋग्वेद ब्राह्मणाज, एच्. ओ. एस., खंड २५, पा. १२८.
१६५. द सेक्रेड बुक्स ऑफ द ईस्ट, खंड २३, पा. ६९.
१६६. आपटेज संस्कृत–इंग्लिश डिक्शनरी.
१६७. दा. ध. कोसंबी, उक्त, पा. ८०.
१६८. उक्त, पा. १२७–१२८.
१६९. जगदीश काश्यप ( सं ), विनयपिटक, पाराजिकपालि १-२-६५.
१७०. वा. श. अग्रवाल, उक्त, पा. २६४.
१७१. वेदिक इंडेक्स, खंड १, पा. १–५.
१७२. आर. ई. ह्यूम, उक्त, पा. २४४.
१७३. द सेक्रेड बुक्स ऑफ द बुक्स ऑफ द ईस्ट, खंड ४४, पा. ४१०–४११.
१७४. दा. ध. कोसंबी, ॲन इन्ट्रॉडक्शन टु द स्टडी ऑफ इंडियन हिस्टरी, पा० १४८–१४९, १६८,२१७.
१७५. डब्लू. रॉबर्टसन स्मिथ, उक्त, पा. ४८८.

१७६. पद्मनाभ मेनन, उक्त, पा. ४०८.
१७७. आर. ई. ह्यूम, उक्त, पा. २१७–२१८.
१७८. वा. श. अग्रवाल, उक्त, पा. ३९४–३९५.
१७९. महाभारत, १३-५१-६.
१८०. जगदीश काश्यप ( सं. ) जातकपालि, २२-५४७-२३२४–२३२५; देव राज चायना, उक्त, पा. ७४.
१८१. जातक ( हिंदी ), खंड ३, पा. ३३.
१८२. आर. फिक, उक्त, पा. ३०८.
१८३. देव राज चायना, उक्त पा. ७४.
१८४. एस. के. मैती, द एकॉनॉमिक लाइफ इन नॉदर्न इंडिया इन द गुप्त पीरिअड, पा. १७१.
१८५. पद्मनाभ मेनन, उक्त पा. २७८.
१८६. उक्त, पा. २७८–२७९.
१८७. उक्त, पा. २७९.

---



अनुक्रमणिका








श्री. रा. व. जोशी

# राष्ट्रभाषा व राष्ट्रीयता

राष्ट्रभाषेचा प्रश्न आजचा ज्वलंत प्रश्न आहे. स्वातंत्र्य मिळून जवळ जवळ दोन तपावर काळ लोटला. तरीही राष्ट्रभाषेचा प्रश्न अजून निकालात निघाला नाही. राष्ट्रभाषा व राष्ट्रीयता हे एकमेकाशी अगदी अंतरंगातून निगडित आहेत. राष्ट्रभाषेशिवाय राष्ट्रीयता ही अपुरीच, राष्ट्रही अपुरेच. राष्ट्रीयतेतच अजून काहीतरी वैगुण्य आहे, काही तरी कमी आहे. म्हणून राष्ट्रभाषेचा प्रश्न अजून रेंगाळत राहिला आहे. राष्ट्रीयता हाच अजून ज्वलंत प्रश्न आहे. "इसमें कोई संदेह नहीं कि देश को आज वैज्ञानिक एवं तकनिशियनों की आवश्यकता है, लेकिन इससे भी बढकर भारत को ऐसे व्यक्तित्व की आवश्यकता है जो स्वयं को 'भारतीय' समझें।" हे पंतप्रधान श्रीमती इंदिरा गांधींचे उद्‌गार याच वस्तुस्थितीकडे बोट दाखवितात. "जननी जन्मभूमिश्च स्वर्गादपि गरीयसी" या राष्ट्रीय भावनेचे प्रेम जेव्हा अंतःकरणात भरतीला येते, तेव्हा "निजभाषा उन्नति अहै सब उन्नति को मूल।" हा पान्हा अनावरच होतो. पूर्ण विकसित राष्ट्रीयता ही राष्ट्रभाषेशिवाय बेचैन होते. राष्ट्रभाषा ही राष्ट्रप्रेमाचा पाया व कळस आहे. राष्ट्रप्रेमाशिवाय राष्ट्रीयत्व हे कायद्याचे शुष्क टरफल. त्यात अंतःकरणाचा ओलावा नाही. त्यात स्फूर्ती नाही, दीप्ती नाही, तेज नाहीं. राष्ट्रप्रेमपूरित अंतःकरण राष्ट्रभाषेविना मूक निष्प्राण राष्ट्रीयत्वाचे जिणे जगूच इच्छिणार नाही. राष्ट्राला राष्ट्रभाषा ही एक आवश्यक बाब आहे. ज्या राष्ट्राला राष्ट्रभाषा नाही, ते राष्ट्र मूक. मुका कितीही हुशार व कर्तबगार असो, त्याच्यापेक्षा वाचा असणाऱ्या कमी हुशार व कमी कर्तबगार माणसाचेही भविष्य उज्वल असते, त्याचा जास्त दबदबा असतो. मुकेपण हे केव्हाही असह्य व लाजिरवाणेच असते.

अनुक्रमणिका

अमीर खुसरो राष्ट्रभाषेचा आद्यकवी

खुसरो साहित्याचे मर्मज्ञ विद्वान् डॉ. अशोककुमार भट्टाचार्यांनी खुसरोच्या राष्ट्रभाषेच्या प्रेमाबद्दल लिहिताना म्हटले आहे, "जर मला ईश्वरासमोर जाण्याची व काही प्रार्थना करण्याची संधी मिळाली, तर मी अशी प्रार्थना करीन की, हे ईश्वरा, खुसरोला एकदातरी या पृथ्वीतलावर पाठव व त्याच्या स्वप्नाची 'हिन्दवी' ( म्हणजे आजची हिन्दी ) आज राष्ट्रभाषेच्या गौरवपूर्ण पदावर आसीन होत असल्याचे पाहण्याची त्याला एकदा तरी संधी दे."

हिन्द व हिन्दोस्तान हे तत्कालीन देशनाम. हिन्दवी हे तत्कालीन देश-भाषेचे नाव. हिन्दोस्तानी हे तत्कालीन शवासियाचे नाव. खुसरो हा स्वत ला "तुर्की हिन्दोस्तानी" मानीत असे, व त्याचा तो अभिमान बाळगीत असे. 'हिन्दवी' वर खुसरोचे अत्यंत प्रेम होते. हिन्दवी पुढे त्याची मातृभाषा तुर्की, धर्मभाषा अरबी, व सांस्कृतिक भाषा फारसी, यांचेही महत्व त्याला वाटत नसे. या सर्वांपेक्षा हिन्दवीच त्याला अधिक गोड वाटे. हिन्दवीच्या गोडीने तो पूर्ण मोहित झाला होता. हिन्दवीचा व हिन्दोस्तानी राष्ट्रीयत्वाचा त्याचा अभिमान कमालीचा होता. त्याने म्हटले आहे, " तुर्क – इ – हिन्दोस्तानीम् मन्दर, हिन्दवी गोयम् जवाब। शक्कर – इ – मिश्रीन दारम्, कज अरब गोयम् सुखन् ॥ "

खुसरोचा जन्म उत्तर प्रदेशातील एटा जिल्ह्यात पटियाली गावी सन १२५३ मध्ये झाला. त्याचे मूळ नाव अबूल हसन यामिनुद्दीन असे होते. पण 'खुसरो' या उपनामानेच तो विशेष प्रसिद्ध होता. खुसरोचा बाप मध्य आशिया-तील तुर्कीचाचीन टोळीचा एक सरदार होता. त्याचे नाव अमीर सेफुद्दीन मुहम्मद असे होते. चंगीझखानाच्या वेळी तो भारतात आला, व एटा जिल्ह्यात स्थानिक झाला. खुसरो चार वर्षांचा असताना अमीर सेफुद्दीन मुहम्मदने आपला मुक्काम दिल्लीस हलविला. त्यावेळी खुसरोही बापाबरोबर दिल्लीत आला, व त्याचे प्रारंभिक शिक्षण दिल्लीतच झाले. लहानपणापासूनच तो अत्यंत कुशाग्रबुद्धीचा होता, व शिकण्याची त्याला फार आवड होती. त्याच्या अप्रतिम बुद्धिमत्तेची लक्षणे तेव्हाच दिसू लागली होती. खुसरो आठ वर्षांचा असताना त्याचा बाप अमीर सेफुद्दीन मुहम्मद युद्धात मरण पावला. त्यामुळे खुसरोची आई खुसरोला घेऊन आपला बाप इमादुल मुल्क याच्या घरी गेली. इमादुल मुल्क हा बल्बनचा युद्धमंत्री होता. इमादुल मुल्क हा भारतीय संस्कृतीबद्दल अत्यंत आस्था बाळ-गणारा होता. या आजोबाच्या देखरेखीखालीच खुसरोचे पुढील शिक्षण आजो-

अनुक्रमणिका

ळीच झाले. आजोबाच्या भारतीय संस्कृतीबद्दल आदराचे संस्कार खुसरोवर बालवयातच झाले. पुढे आजोळी थोड्याच वेळात तो तत्कालीन शिक्षणक्रमानुसार अनेक विद्यात व अनेक भाषात पारंगत झाला. तत्कालीन तत्त्वज्ञान व विज्ञान यात फार मोठी गती मिळविली. तरी पण बालपणापासून त्याची प्रतिभा विशेष काव्योन्मुखच होती. किशोरावस्थेतच त्याने काव्यलेखन सुरू केले, व वीस वर्षांचे वय होते ना होते तोच कवी म्हणून प्रसिद्धीस आला. तुर्की, अरबी, फारसी, संस्कृत, व काही भारतीय प्रांतीय भाषांचे त्याचे ज्ञान उत्तम प्रतीचे होते. नंतर त्याने विपुल ग्रंथनिर्मिती करुन अप्रतिम प्रतिभा दाखविली. श्रेष्ठ कवी व व्युत्पन्न पंडित म्हणून दिल्लीत सुलतानाच्या दरबारात दरबारी मानकऱ्याचे मानाचे पद त्याला मिळाले. हे मानाचे पद त्याने सात सुलतानांच्या दरबारात भूषविले.

खुशरो जन्मजात कवी असूनही त्याची व्यावहारिक बुद्धीही फार मोठी होती. खुसरोने पाहिलेल्या अनेक सुलतानांच्या कारकीर्दीत प्रत्येक सुलतानाच्या उत्तराधिकाऱ्याच्या प्रश्नाच्या सोडवणुकीच्यावेळी अनिवार्यपणे दरबारी कारस्थाने, सुलतानांचे खून, व राजकीय डावपेच, हे चालू असत. पण खुसरो त्याच दरबारात राहून या सर्व भानगडीपासून नेहमी अनासक्त व अलिप्त राहिला. केवळ एक कवी, एक कलाकार, एक संगीतज्ञ, व एक सैनिक म्हणूनच तो दरबारी जीवनात वावरला; इतकेच नव्हे तर ज्या आश्रयदात्या सुलतानाचा तो कृपापात्र व सम्मानभाजन राहिला त्याच सुलतानाचा खून करून गादीवर आलेल्या नंतरच्या उत्तराधिकारी सुलतानाकडूनही त्याला तितकाच आदर व सन्मान मिळाला. अल्लाउद्दीन खिलजी व त्याचा मामा पूर्ववर्ती सुलतान जलालुद्दीन, ज्याचा खून करून अल्लाउद्दीनाने गादी बळकावली, या दोघांचाही खुसरो हा सारखाच कृपापात्र होता, हे एक ठळक उदाहरण आहे. हाच त्याच्या व्यावहारिक बुद्धीचा वा व्यवहारकुशलतेचा सर्वात जास्त सबळ पुरावा आहे.

महान सूफी संत हजरत निझामुद्दीन औलिया 'महबूब-इ-इलाही' हे खुसरोचे आध्यात्मिक गुरू होते. त्यानीच खुसरोला अल्पवयातच काव्यरचनेची प्रेरणा दिली. खुसरोच्या शालीन वागणुकीमुळे ते त्याच्यावर बेहद्द खूष होते, व खुसरोला 'तुर्क-इ अस्सलाह' या नावाने मोठ्या प्रेमाने हाक मारीत असत. खुसरोचीही आपल्या गुरूवर निस्सीम भक्ती होती. प्रत्येक काव्याच्या समर्पणाच्या वेळी गुरूचे स्मरण प्रथम व नंतर आश्रयदात्या सुलतानाचे स्मरण तो करीत असे. सन १३२५ मध्ये खुसरोचे गुरू मरण पावले. खुसरोचा आपल्या

गुरुवर इतका जीव होता की तो गुरुचा वियोग सहन करू शकला नाही. गुरुच्या मृत्यूचे इतके आत्यंतिक दुःख त्याला झाले की गुरुच्या मृत्यूनंतर अवघ्या सहा महिन्याच्या आतच तोही मरण पावला. त्याची समाधी गुरुच्या दर्ग्याजवळच आहे. आजही तेथे उर्स होतो. व यात्रा भरते. हिन्दु व मुसलमान हे दोघेही तेथे एकत्र येऊन आपली श्रद्धासुमने या महान् सूफी संताला अत्यंत भक्तिभावाने अर्पण करतात. हिन्दु–मुस्लिम सांस्कृतिक समन्वयाच्या स्वप्न-द्रष्टयाला ही हिन्दु–मुसलमानाची एकत्रित श्रद्धांजली सार्थक व महत्वपूर्ण आहे.

मध्ययुगीन काळात हिन्दु–मुस्लिम संस्कृति–समन्वयाच्या भावनेने प्रेरित होऊन हिन्दु–मुस्लिम भावनिक ऐक्याची पाऊलवाट पाडण्याचे महा बिकट कार्य उदारवृत्तीच्या थोर मनाच्या सूफी संतमहात्म्यानी केले. धार्मिक व सांप्र-दायिक संकुचितपणाच्या वाढलेल्या घनदाट जंगलातून ही पाऊलवाट पाडणे महा कठिण कर्म होते. हे कठिण कर्म अंगीकृत केलेल्या थोर सूफी संतपरंपरेत खुसरोचा मान अग्रस्थानाचा आहे. हिन्दु–मुस्लिमांची संकुचित दृष्टी व परस्पर द्वेषभाव घालवून त्यांच्यात परस्पर प्रेमाचे बंधुभावाचे वातावरण निर्माण करण्याच्या परंपरेत खुसरोचे स्थान अत्यंत महत्वाचे आहे.

हिन्दवीचा, म्हणजे आजच्या राष्ट्रभाषा हिंदीचा अर्थात् खडी बोलीचा, हा आद्यकवी बहुमुखी प्रतिभावान् होता. त्याने आपल्या असामान्य प्रतिभेने विपुल व मोलाची ग्रंथसंपत्ती निर्माण करून ठेविली आहे. त्याने एकूण ९९० ग्रंथ लिहिले असे म्हणतात. पण सध्या उपलब्ध ग्रंथ २२ आहेत. यापैकी तोहफ तुरिसगहर, वास्तुलहयात, गर्बतुल कमाल, हिनहायतुल कमाल, किरानुस्सादैन, मिलत्तुल फतह, देवलरानी खिज्रखाँ, नुहस्सिपर, तुगलकनामा, खम्सए खुसरो, एजाण-ए-खुसरवी, अफजलुल पवाइद, खजाइनुल फतह, खालिक बारी, आदी ग्रंथ विशेष उल्लेखिले जातात. सन १२७५ पासून सन १३३५ पर्यंत त्याने दिल्लीत तीन अफगाण राजवंशाचे उत्थानपतन व अकरा सुलतान गादीवर बसलेले पाहिले होते. त्यापैकी सात सुलतानांच्या दरबारात त्याने स्वतःच मानाचे पद भूषविले होते. दरबारी जीवन त्याने अंतरंगातून पाहिले होते. राजकीय घडामोडी सूक्ष्म दृष्टीने त्याने न्याहाळल्या होत्या. उपर्युक्त ग्रंथात तत्कालीन ऐतिहासिक वातावरणाचे मोठे चित्तवेधक व सजीव चित्रण आढळते. खुसरोने ज्या मस्नवी व कसीदे लिहिल्या त्यात त्याच्या पाच रोमँटिक मस्नवी "पंच गंज" या नावाने विशेष प्रसिद्ध आहेत. या पाच मस्नव्या म्हणजे 'मल्लोन अनवर', 'शिरीन खुसरो', 'मजनु-लैला', 'आईन-ए-सिकन्दरी', व 'हश्त

विहृत ' या होत. खुसरोंने तत्कालीन काव्यशास्त्र व विविध साहित्य विधांचीही उद्‌बोधक चर्चा केली आहे. खुसरोने 'खजाइनुल फतह' ज्यात अल्लाउद्दीन खिलजीच्या विजयाचे वर्णन आहे,[१] व 'एजाज-ए-खुसरवी', जो एक अलंकार ग्रंथ आहे, हे दोन गद्य ग्रंथ जरी लिहिले होते, तरी तो प्रामुख्याने कवीच. त्याचे काव्य लेखनच खूप. गद्यलेखन तुरळकच.[२]

खुसरो हा तसे पाहाता प्रामुख्याने फारसी कवी. फारसी भाषेवर त्याचा असामान्य अधिकार. त्याची गणना फिरदोसी, शेख सादी, व निजामी यांच्या सारख्या ईराणच्या महाकवींमध्ये होते. त्याच्या फारसी काव्याचे लालित्य व मार्दव पाहून त्याला 'हिन्दचा पोपट' म्हणत असत.

जरी खुसरोचे साहित्यिक महत्व त्याच्या फारसी काव्यावर आधारित असले, तरी त्याची लोकप्रियता त्याच्या 'हिन्दवी'तील काव्यावरच आधारित आहे. हिन्दवीत काव्यलेखन करणाऱ्यामध्ये खुसरोचे नाव सर्वात प्रथम व प्रमुख आहे.[३] त्याच्या नावाने हिन्दवीत उखाणे, मुकऱ्या, दोन सुखने, व काही गजले प्रसिद्ध आहेत. याशिवाय त्याचा फारसी-हिन्दवी कोश खालिकबारीही येथे उल्लेखनीय आहे. त्याचे उखाणे व मुकऱ्या आजही लोकप्रिय आहेत. गजलच्या क्षेत्रात त्याने अनेक प्रयोग केले. त्यापैकी एक विलक्षण प्रयोग म्हणजे फारसी व हिन्दवीचे मिश्रण, म्हणजे एक ओळ फारसीत व एक ओळ हिन्दवीत. या सर्वापेक्षा विशेष लक्षात ठेवण्यासारखी गोष्ट म्हणजे, अनेक भाषात पारंगत असूनही, आई बाप परदेशी ( म्हणजे तुर्की ) असूनही, जन्मजात धर्म इस्लाम असूनही, त्याचे हिंदवीचे, हिंदोस्तानीयत्वाचे, हिंदोस्तानीय संस्कृतीचे प्रेम अप्रतिम व मोठे कौतुकास्पद होते.

खुसरोच्या व्यक्तिमत्वात भारताच्या ऐतिहासिक कालप्रवाहात विकसित झालेल्या राष्ट्रीय अस्मितेची प्रधान लक्षणे नेत्रदीपकपणे प्रस्फुटित झालेली दिसतात. त्याचे राष्ट्रप्रेम, त्याचे भारतभूचे प्रेम, त्याचे भारतीय संस्कृतीचे प्रेम, त्याची समन्वय बुद्धी, व त्याच्या मनाचे संतपण, या सर्व गोष्टी भारतीय मूलभूत मनोधर्माच्या प्रकृतीच्या निदर्शक आहेत. तो अभारतीय मातापित्याच्या उदरी जन्मूनही पूर्णांशाने भारतीय होता. तो विकसित भारतीय राष्ट्रीय अस्मितेचा मूर्तिमंत प्रतीक होता. याची दोन वेडे होती, दोन स्वप्ने होती. एक होते राष्ट्रभाषेचे. दुसरे होते हिंदु-मुस्लिम संस्कृति-समन्वयाचे. त्यापैकी एक आज पूर्ण होण्याच्या मार्गावर आहे. हिंदी खडी बोलीच्या रूपात राष्ट्रभाषा होण्याचे आता निश्चितच आहे. पण दुसरे अजून स्वप्नच आहे. अजून वेडच राहिले आहे.

अनुक्रमणिका

भारतात आलेले मुसलमान, धर्माने इस्लामी असले, निरनिराळ्या वंशाचे असले, निरनिराळ्या मातृभाषांचे असले, तरी संस्कृतीने सर्व फारसी होते. हिंदु–मुसलमानामध्ये धर्माचे भांडण असूनही, संस्कृत–फारसी भाषांतून व्यक्त होणाऱ्या दोन सांस्कृतिक जीवनपद्धतीचा परस्परावर समन्वयी परिणाम झालाच आहे. नंतर आलेल्या इंग्रजांच्या ख्रिश्चन् धर्माचे जरी पटले नाही, तरी हिंदूमध्ये धर्माने हिंदु असूनही बरेच इंग्रजीपण जीवनात मुरून गेले आहे. इंग्रज गेले तरी इंग्रजीपण राहिलेच. ते घालवू म्हटले तरी जाणार नाही.[४] धर्मभिन्नता असूनही व ती चांगली जपूनही, ऐतिहासिक कालप्रवाहात आमच्या डोळ्यादेखत होत असलेला हा संस्कृतिसमन्वय, हे खुसरोचे स्वप्न कधीकाळी सत्यसृष्टीत उतरेल, खुसरोचे वेड कधीकाळी दिव्यदृष्टीचे दूरदर्शन ठरेल, याची अंधुक आशा निर्माण करतो.

महान् प्रतिभाशाली व्यक्तित्व हे नेहमी समकालीन युगबोधाच्या बरेच पुढे झेप घेत असते. समकालीन युगबोध नंतर मंद चालीने त्याचेच अनुसरण करीत असतो. खुसरो ही अशीच एक व्यक्ती होती. त्याची झेपही अशीच होती. असामान्य दिव्यदृष्टीचा तो एक द्रष्टा महात्मा होता, एक युगपुरुष होता. आजचा युगबोध महान् सूफी संत खुसरोचेच अनुसरण करीत आहे.[५]

## अमीर खुसरो आदर्श अभारतीय भारतीय

भारतीय समाज हा अनेक ऐतिहासिक स्थित्यंतरातून गेला आहे. त्यात जाती, धर्म, पंथ, वंश, चालीरीति, सामाजिक सांगाडे, विधिनिषेध कल्पना, विश्वास, अंधविश्वास, देवदेवता, साधनपद्धती, बदलती भावानुभूती, बदलते युग-बोध यांचे इतके विपुल वैविध्य आहे, की जसजशा इतिहासाच्या घडचा उलगडा-व्यात तसतसे ते आणखीन जास्तच गोंधळून टाकणारे आहे. इतके विविध व विपुल धागेधोरे जरी ऐतिहासिक विकासाच्या कालक्रमात नजरेस पडत असले, तरी हा सर्व इतिहास म्हणजे एक जटिल गुंतोळाच नाही, तर त्यातून एक सुबक सुंदर मनमोहक स्पष्ट वीण पडत आहे, हेही लक्षात ठेविले पाहिजे. इतिहासाच्या प्रवाहात हा व्यवस्थित विकास पावत असलेला स्पष्ट टणक व अखंडित वीणेचा भागच भारतीयतेचा आधार आहे.

राष्ट्रीयता ही राष्ट्रीय इतिहासाच्या पृष्ठभूमीतच रुजणारी, अंकुरणारी, विकास पावणारी वस्तु आहे. बीज कोठलेही असो वा कसलेही असो, राष्ट्रीय ऐतिहासिक मनोभूमिकेत त्याला जोपासून, सामावून घेऊन, आत्मसात् कर-

ण्याची एक विशेष शक्ती असते, एक विशेष लकब असते. म्हणून राष्ट्रीयता हा जन्माचा तितकासा प्रश्न नसून राष्ट्रीय ऐतिहासिक मनोभूमिकेत मुरण्याचा प्रश्न आहे. राष्ट्रीय मनोभूमिकेत मुरला किती, त्याचा प्रातिनिधिक बनला किती, राष्ट्रीय वातावरण आत्मसात् केले किती, राष्ट्राविषयी भावनिक आपुलकी वाटते किती, या राष्ट्रीयतेच्या प्रमुख खाणाखुणा आहेत. जन्माने जरी राष्ट्रीय असला, तरी जोपर्यंत भावनेने राष्ट्रीय ऐतिहासिक अस्मितेच्या विणेत विणला गेला नसेल, या वीणेच्या रंगात जोपर्यंत त्याचे अंतरंग गाढ रंगले नसेल, तोपर्यंत त्याचे राष्ट्रीयत्व कच्चेच समजले पाहिजे. राष्ट्रीयत्वाच्या निकषात जन्मापेक्षा भावना प्रधान मानली पाहिजे.

जन्माबरोबर भावनिक विकास निगडित असतोच. म्हणून जन्मालाही महत्व आहेच. जन्माने राष्ट्रीय तो आजन्म राष्ट्रीय यात शंका नाही. विकृतावस्थेचेच अपवाद होऊ शकतात. पण जन्माने अराष्ट्रीय असूनही, भावनेने राष्ट्रीय असला, तर तोही जन्मजात राष्ट्रीयाप्रमाणेच आजन्म राष्ट्रीय असू शकतो, यातही शंका नाही. राष्ट्रीयत्वात भावनेचे महत्व आहे ते हेच. अमीर खुसरो हा याचेच एक आदर्श ज्वलंत ऐतिहासिक उदाहरण आहे.[६]

अमीर खुसरो हा जन्माने अराष्ट्रीय म्हणजे अभारतीय. पण त्याची भारताशी साधलेली भावनिक एकात्मता पराकोटीची होती. तो धर्माने अहिंदु. पण हिंदु संस्कृतीशी त्याची साधलेली एकात्मता परम कौतुकास्पद होती. तो भाषेने अहिंदवी. पण हिंदवीचे त्याचे प्रेम अप्रतिम होते. भावनिक लक्षणविशेषाच्या जन्माने अराष्ट्रीयाच्या, कौतुकास्पद राष्ट्रीयत्वाचे अमीर खुसरे हे एक ऐतिहासिक ठळक उदाहरण आहे.

मध्यंतरी मुसलमानांचे राष्ट्रीयकरण याविषयी एक खूप वादंग माजले. जनसंघाच्या मधोकनी हा प्रश्न निर्माण केला. काँग्रेसने त्यावर चौफेर हल्ला चढविला. पक्षांच्या पक्षवेडचा हल्ल्याप्रतिहल्ल्यात काही तत्त्वबोध होणे दुरापास्तच असते. यात तात्त्विक अर्थाचा काही भाग असला, तर तो फक्त राष्ट्रीयता व भावनिक एकात्मता याचा जो विचार वर झाला तेवढाच आहे. राजकारणाचे सावट बाजूला सारून, मुसलमानांचे राष्ट्रीयकरण म्हणजे काय, राष्ट्रीय मुसलमान म्हणजे काय, हे पहावयाचे असेल, तर अमीर खुसरो पाहा. राष्ट्रीयत्वाचे, भारतीयत्वाचे निर्मळ स्वरूप पाहायला मिळेल. हिन्दु–मुस्लिम संस्कृति–समन्वयाच्या धाग्याची अन्यत्र कच्ची वाटणारी वीण या ठिकाणी पक्की बसलेली आढळेल.

अनुक्रमणिका

हिन्दु–मुस्लिम वैर हे एक ऐतिहासिक कटु सत्य आहे. पण याच कटुतेत कुराण–मशीदींचा आदर करणारा हिन्दू शिवाजी व देवदेवळांचा आदर करणारा मुसलमान अकबर ही थोडी गोडीचीही खुमारी आहे. शिवाजी व अकबर हे राजकारणी पुरूष हे खरे. यामुळे या गोडीच्या खुमारीत राजकारणी लपंडावाचा वासही काहींना येणे शक्य आहे. पण अमीर खुसरो हा तर राजकारणी पुरुष नव्हे. हिन्दु–मुस्लिम एकात्मतेची खुसरोने चाखविलेली गोडी तर निर्मळ आहे. आता गोडीचाच इतिहास वाढवावयाचा, का कटुताच उगाळीत बसावयाचे, याविषयी हिन्दु व मुसलमान या दोघांनीही आत्मशोधन करून अजूनही विचार करण्यासारखे आहे. 'मुसलमान' या विषयावर अजूनही माजणारे पक्षांधांचे वादंग हेच दाखवितात की ऐतिहासिक वैराचे स्फुलिंग अजूनही विझलेले नाहीत. हा स्फुलिंग फुलविता येतो, चेतविता येतो, यातून राजकारणाची पोळी भाजून घेता येते, हा मोह अजूनही सुटला नाही. पाकिस्तान व महात्मा गांधींचे पवित्र जीवन, याची इतकी फार मोठी किंमत देऊनही, हा लोभ किती हानिकारक या विषयी जनमानसात अजूनही फारशी तीव्र जाणीव झालेली दिसून येत नाही. आत्यंतिक मुस्लिम वैर ही प्रवृत्ती जितकी राष्ट्रघातकी आहे, तितकीच राष्ट्रघातकी आत्यंतिक मुस्लिमधार्जिणेपण ही प्रवृत्तीही आहे. वैराने प्रतिवैराची भावना बळावते. धार्जिणेपणाने नेहमी झुकते माप पदरात टाकून घेण्याची स्वार्थी वृत्ती बळावते. परिणामी दोन्हीनेही दुहेरी राष्ट्रघात होतो व झाला आहे. 'मुसलमान' या विषयावर अजूनही अंधकारमय वाटणाऱ्या या परिस्थितीत अमीर खुसरो हा दीपस्तंभासारखा आहे. त्याच्यापासून स्फूर्ती घेण्यासारखी आहे.

भारतीय राष्ट्रीय अस्मितेची जी लक्षणे ऐतिहासिक घटनाप्रवाहाच्या ओघात प्रस्फुटित व विकसित झाली, ती सर्व अमीर खुसरोच्या मनोवृत्तीत ठळकपणे दिसतात. हा अभारतीय भारतीय, भारतीय राष्ट्रीय अस्मितेचा पूर्णांशाने आद्य प्रतिनिधी आहे.

खुसरोच्या व्यक्तिमत्त्वाचे विश्लेषण केल्यास, देशप्रेम, राष्ट्रभाषाप्रेम, बहुभाषाप्रेम, बहुविद्याव्यासंग, धार्मिक वृत्ती, व समन्वयवृत्ती ही प्रधान लक्षणे दृष्टीस पडतात. ही परिपक्व भारतीय मनोवृत्तीची इतिहाससिद्ध लक्षणे ठरली आहेत. म्हणून यांना भारतीयत्वाचा आत्मा मानला पाहिजे. ज्याच्यात ही सर्व लक्षणे विद्यमान तो पूर्ण भारतीय, ज्याच्यात यातील प्रत्येक लक्षण अत्युत्कृष्ट मात्रेत विद्यमान तो संपूर्ण भारतीय.

अनुक्रमणिका

यापैकी देशप्रेम व राष्ट्रभाषाप्रेम हे कोठल्याही राष्ट्रीयत्वाचा आत्मा आहे. म्हणून तशी भारतीय राष्ट्रीयत्वाचीही ही महत्वाची आधारभूमी आहे. या देशाला आजच्या संस्कृतीची आधारशिला पुरविणारे, आजच्या संस्कृतीची बैठक जमवून दिलेले, आर्य हेही मूळचे बाहेरचेच. म्हणून बाहेरच्याचे या देशाविषयी आत्यंतिक प्रेम, या देशाला स्वतःचाच देश मानणे, स्वतःला या देशात बाहेरचा परका उपरा न मानणे, या देशाच्याच उत्कर्षासाठी जिवापाड झटणे, या देशाच्या सुखदुःखाबरोबर आपले व्यक्तिगत सुखदुःख निगडित मानणे, या देशाच्या बाहेर कोठल्याही परदेशी स्वर्गाची स्वप्ने न पाहाणे, हे भारतीय देशाभिमानाचे प्रधान लक्षण इतिहासानेच ठरविले आहे. त्यात जन्माने अथवा पितृत्वाने बाहेरचा असणे ही फारशी महत्वाची बाब नाही. भावनेने पूर्ण भारतीकरण हे भारतीय देशाभिमानाचे प्रधान लक्षण आहे. म्हणून अमीर खुसरोचा देशाभिमान, पितृत्वाच्या दृष्टीने बाहेरचा असूनही, जो अप्रतिम होता तो वाखाणण्यासारखा तर होताच, पण ऐतिहासिक संस्काराच्या दृष्टीने तो आदर्श देशाभिमानही ठरतो.

राष्ट्रभाषेशिवाय राष्ट्रीय व्यक्तिमत्व हे अपुरे आहे. म्हणून राष्ट्रभाषाप्रेमाशिवाय राष्ट्रप्रेमही अपुरे आहे, राष्ट्रीयत्वही अपुरे आहे. आज जगात असे कुठलेही राष्ट्र नाही की ज्याला राष्ट्रभाषा नाही व जी आल्याशिवाय त्या राष्ट्राचे राष्ट्रीयत्व मिळू शकते. भारत हा आज जगात एकच देश आहे की जेथे राष्ट्रभाषा नाही व जेथे राष्ट्रभाषेच्या अटीशिवाय राष्ट्रीयत्व मिळू शकते. असे अन्य उदाहरण शोधावयाचेच झाल्यास नुकत्याच गुलामगिरीतून मुक्त झालेल्या व भारतापेक्षा मागासलेल्या राष्ट्रामध्ये असे उदाहरण मिळू शकेल, पण पुढारलेल्या राष्ट्रामध्ये असे उदाहरण मिळू शकणार नाही. स्वदेशप्रेमाप्रमाणेच स्वदेशभाषाप्रेम हेही नेहमी भारतीयत्वाचे महत्वाचे अंग राहिले आहे. तरी स्वदेशातील प्रांतभेदातून स्वदेशभावना थोडी लवकरच मूळ धरली. स्वदेशातील भाषाभेदातून राष्ट्रभाषेची भावना अजूनही चांगले मूळ धरू लागली नाही. हे बीज अजूनही सुप्तच आहे. अमीर खुसरोला देशातील व देशाबाहेरील विविध भाषांचे ज्ञान व त्यांचा चांगला व्यासंग असूनही, त्याचे सर्वात जास्त प्रेम राष्ट्रभाषा ‘ हिन्दवी ’ वरच होते. त्याच्या अंतःकरणात हे सुप्त बीज चांगले अंकुरले होते. त्याच्या मनोभूमिकेत राष्ट्रीयत्व चांगले प्रस्फुटित झाले होते, चांगले विकसित झाले होते. त्याच्या देशाभिमानाची, त्याच्या राष्ट्रीयत्वाची, वाढ पूर्णत्वास पोचली होती. त्याचे अंतःकरण राष्ट्रीय भावनेने पूर्ण ओथंबलेले होते, व त्यांच्या ओसंडणाऱ्या राष्ट्रीय भावनांना वाट द्यायला त्याला

राष्ट्रभाषाही होती. त्याचा देशाभिमान मूक नव्हता. त्याचे राष्ट्रीयत्व मुके नव्हते. त्याच्या प्रखर राष्ट्रीयत्वाला त्याच्या कळकळीची राष्ट्रभाषा होती. राष्ट्रभाषाप्रेमाच्या दृष्टीने खुसरोचे ‘ हिन्दवी ’ चे प्रेम आजही आदर्श आहे.

भारत हा आजही बहुभाषी, बहुरंगी, बहुढंगी देश आहे. पूर्वीचाही त्याचा इतिहास असाच आहे. भारताची एक राष्ट्रभाषा झाल्यावरही, ऐतिहासिक व सांस्कृतिक दृष्टया प्रत्येक भारतीयाला काही अंशी बहुभाषिक हे झालेच पाहिजे. ती एक आवश्यकता आहे. भारताचा ऐतिहासिक ठेवाही विविधभाषी आहे, व आजही भारताच्या विविध प्रांताचा शेजार व परिसर विविधभाषीच आहे. छोटया एकसंध एकभाषिक देशाची गोष्ट वेगळी. भारतासारख्या स्वरूपाच्या व एवढया विस्तीर्ण खंडप्राय देशाच्या राष्ट्रीयाला ऐतिहासिक व समकालीन राष्ट्रीय सांस्कृतिक विराट् रूपाशी समरस होण्यास थोडेबहुत शक्य असेल तेवढे बहुभाषिकत्व राष्ट्रीयत्वाचा एक अत्यावश्यक तगादाच आहे. अमीर खुसरोचे राष्ट्रभाषा प्रेमाबरोबरच बहुभाषाप्रेम व बहुभाषा व्यासंग त्याच्या भारतीयत्वाचा एक आदर्श पैलूच दाखवितो.

विद्याप्रेम हा भारताचा स्वभाव आहे. प्राचीन काळी भारताची विद्येबद्दल जगभर ख्याती होती. भारत हे विद्येचे माहेरघर मानले जात होते. भारत हा प्राचीनकाळी जगद्‌गुरु होता. विद्याव्यासंग हा भारताचा ऐतिहासिक स्वभाव ठरला आहे. आजही जर्मनी म्हटले की बुद्धिमत्ता, फ्रान्स म्हटले की कलाप्रेम, इंग्लंड म्हटले की व्यापारवृत्ती, ही जशी त्या राष्ट्राची ठोकळ राष्ट्रीय स्वभावलक्षणे जनमानसात ठरून गेलेली आहेत, तसे भारत म्हणजे विद्याव्यासंग हे प्राचीन काळचे समीकरण होते. विद्याव्यासंगाचा स्वभाव आपण टिकविला पाहिजे, वाढविला पाहिजे, हरवलेले जगद्‌गुरुपद पुनः मिळविण्यास धडपडले पाहिजे. हा एक राष्ट्रीय अस्मितेचा तगादा आहे. अमीर खुसरोचा बहुविद्याव्यासंग, त्याची बहुश्रुतता, हा त्याच्या स्वभावातला विशेष त्याच्या भारतीयत्वाचे प्रकर्षाने आदर्श द्योतक असल्याचे दाखवितो.

धर्म हा भारतीयत्वाचा आत्मा. भारतीयत्वातून धर्म वगळला तर त्यात भारतीय असे काही फारसे शेष उरणे कठीणच. प्राचीन काळी भारत हा जगाचा अनेक विद्यामध्ये जरी जगद्‌गुरू होता, तरी त्याने धर्माच्या बाबतीत जगाचे जे जगद्‌गुरुपद विशेष प्रामुख्याने व विशेष चिरस्मरणीय रूपात भूषविले, ते अजूनही हतप्रभ झालेले नाही. जगातून जरी धर्माचे उच्चाटन झाले, तरी भारत हा त्याचा शेवटचा आसरा ठरेल. भारतीय जनमानसातून धर्मबीज

उखडून टाकणे फारच कठीण. भारतीय स्वभावात ते इतके खोल रुजले आहे. भारतीय स्वभावात धार्मिकता इतकी खोल मुरली आहे. म्हणून भारत हे भारताच्या राष्ट्रीयांना एक राष्ट्रच नव्हे; तर ती पुण्यभू आहे. किंबहुना ती राष्ट्रापेक्षा पुण्यभू धर्मभूच जास्त आहे. भारतीय स्वभावात राष्ट्रप्रेमापेक्षा धर्मप्रेमच जास्त आहे. इतके भारतीय स्वभावात धार्मिकतेचे प्राबल्य आहे. पण ही धार्मिकता एक विशेष प्रकारची, विशेष आविर्भावाची, विशेष अस्मितेची आहे; की ज्याची तोड जगाच्या इतिहासात अन्यत्र नाही. बाहेरून आलेल्या आर्यांनी तर या देशाला धर्माची आधारशिला व संस्कृतीची बैठक घालून दिली. बाहेरून आलेल्या आर्यांची धर्मभूमी हीच, पुण्यभूमी हीच. या पुण्यभूमीत त्यांनी घालून दिलेल्या वैदिक धर्माच्या भूमिकेतून काही विशेष विकसित झाले, व तेच या देशाच्या देशवासियाचे स्वभाव बनले. त्या विशेषांनी भारतीयांचा धार्मिक स्वभाव बनविला व ते विशेष जगाच्या इतिहासात अन्यत्र आढळत नाहीत. या सर्व विशेषाचे मूळ म्हणजे परधर्मसहिष्णुता. बाहेरून आलेल्या विजिगीषु आर्य मनाच्या मुशीत सहिष्णुभावनेचा उदय ही या देशातील एक चित्त-वेधक ऐतिहासिक किमया आहे. या सहिष्णुतेच्या मुळाशी सर्वदेवैकरूपत्वाची कल्पना आहे. एकेश्वरवादाची एकता ही अनेक देवांच्या छातीवर तुडवून प्रस्थापित झाली. पण सर्वदेवैकरूपत्वाची एकता ही अनेक देवांचे देवपण राखून, त्यांचा मानसन्मान राखून, त्यांचे आदरपावित्र्य राखून प्रस्थापित झाली. एक देव अन्य देवाच्या ठायी पाहाणे व अन्य देव एक देवाच्या रूपात पाहाणे ही अद्वितीय एकदेवत्वाची कल्पना, ही भारतीयाच्या अतुलनीय परधर्म-सहिष्णुतेची आधारभूमी आहे, हे भारतीय धर्ममानसाच्या समुद्रमंथनातील मिळालेले एक अमूल्य रत्न आहे. या रत्नाचे तेज हा भारतीय धर्मज्योतीचा आत्मा, भारतीय धर्मस्वभावाचे व्यवच्छेदक लक्षण या मुळातून फोफावलेले, विकसित झालेले, ईश्वरानुसंधान व परसाधनसहिष्णुता या दोन गोष्टी भारतीयांच्या धर्मस्वभावाचे महत्वाचे अंग बनल्या आहेत. या स्वभावाची जोपासना भारतीयांच्या अस्मितेचा एक अवश्यक दबाव आहे. तो खऱ्या भारतीयाच्या अंतरात्म्यात अनुभूत होतो, त्याचे आस्तित्व जणवते, तो खऱ्या भारतीयत्वाचा मूलभूत द्योतक आहे. अमीर खुसरोचा धार्मिक स्वभाव, धार्मिक साधन, थोर सहिष्णु संतमन, हे त्याचे भारतीयत्व आदर्श रूपात प्रस्तुत करतात.

समन्वयवृत्ती हा भारताचा ऐतिहासिक स्वभावधर्म आहे. आणि आज त्याला आपद्धर्म म्हणून तरी मानणेही भागच आहे. भारताचे आजचे स्वरूप

पाहिले, तर त्यातून कोणत्याही एका घटकाला अन्य घटकांना समूळ उखडून टाकून एकसंध एकरस समाज निर्माण करणे अशक्यप्राय आहे. पूर्वीच्या किंवा अलीकडच्या तशा काही सोइस्कर हुकुमशहाची उदाहरणे घेऊन अशी स्वप्ने रंगविणे, अशा स्वप्नांनी काही जन्मजात संस्कारगत अभिनिवेशांना खतपाणी घालून वाढवून लोकांना बहकविणे, व अशा काही बहकलेल्या माथेफिरूंच्या बळावर अशी अतिरंजित, अतिरेकी, इतिहासाने अमान्य केलेली स्वप्ने सत्यसृष्टीत उतरविण्याचा अट्टाहास धरणे, यात ऐतिहासिक असमंजसपणाबरोबरच व्यावहारिक असमंजसपणाही आहे. अशा कुठल्या हुकुमशहाची इतिहास साक्ष देतो की ज्याने आपली असली अतिरेकी स्वप्ने सत्यसृष्टीत उतरविली व ती नंतर इतिहासात टिकून राहिली? कुठला जुना वा नवा हुकूमशहा कुठल्याही देशातून कोठल्याही एका जातीजमातीला समूळ उखडून टाकून, आपल्या जातीजमातीची एकसंध एकरस विशुद्ध समाजव्यवस्था टिकविण्यात यशस्वी झाला? इतिहास अपयशाचीच साक्ष देत असताना, पुन: तशीच स्वप्नसृष्टी उभारण्यात कोणता व्यावहारिक समंजसपणा? व्यवहारी सृष्टीचा तगादा म्हणून, आजच्या परिस्थितीची गरज म्हणून, ज्यांच्या मनाला अशी स्वप्ने अजूनही तात्विकदृष्टचातरी असमंजसपणाची वाटत नाहीत त्यानीही सध्याच्या काळाचा आपद्धर्म म्हणून, समन्वयवृत्ती ही सर्व भारतीयांनी मानणे आवश्यक अशी आज भारतीय राष्ट्रीयत्वाची गुरुकिल्ली मानली पाहिजे.

भारताचा इतिहास पाहिला तर तोही या आजच्या व्यवहारसंमत समन्वयवृत्तीचाच पाठपुरावा करणारा आहे, समन्वयवृत्तीचाच समर्थक आहे, समन्वयवृत्तीचाच पोषक आहे. तो आजवर अनवधानपणे समन्वयवृत्तीच्याच रोखाने पावले टाकीत आला आहे. प्राचीन काळी बाहेरून आलेल्या आर्यांनी प्राथमिक संघर्षानंतर येथेच स्थायिक झाल्यावर, येथल्या मूळ लोकांना सामावून घेतले, उखडून टाकले नाही. द्राविडाना आपल्यात समन्वित करून घेतले. द्राविड देवदेवतानाही आपल्या देवदेवतांच्या प्रभावळीत जागा करून दिली. द्राविड संस्कृतीची पुटेही आर्यसंस्कृतीवर इतकी बेमालूम चढली की आज ती द्राविड म्हणून ओळखू येणेही दुरापास्त झाले आहे. हे झाले संस्कृती व समाजव्यवस्थेच्या क्षेत्रातील प्राचीन काळचे उदाहरण.

उपनिषत्काली स्वतंत्र दार्शनिक चिंतकांचे पेवच फुटले. मतमतांतराचे उदंड पीक आले. किती 'दिट्ठी' जन्मास आल्या याची बुद्धाच्या वेळी बरोबर मोजमाप करणेही कठिण झाले. किती दिट्ठी किती वेगवेगळचा तत्वज्ञानाच्या भाषा

बोलत होत्या? विचारस्वातंत्र्याचे, मतस्वातंत्र्याचे, साधनस्वातंत्र्याचे, हे एक अप्रतिम वातावरण होते, की ज्याची तुलना जगाच्या इतिहासात अन्यत्र नाही. जगात अन्यत्र असहिष्णुतेनी डागळलेलीच इतिहासाची पृष्ठे जास्त आढळतात. या वातावणारचे गमक म्हणजे भारतीय मनोभूमिकेचे अंगीभूत सहिष्णुत्व हीच समन्वयाची जननी असते. म्हणून या मतमतांतराच्या गलबल्यातून भारतीय दार्शनिकानी समन्वयवृत्तीने, सूक्ष्मदृष्टीने, नीरक्षीरन्यायाने चिंतन करून, काही विशिष्ट कोरीव वैदिक व अवैदिक दर्शने घडविली. त्यात इतका दम होता की ती भारतीय विचारसृष्टीत आजवर जिवंत आहेत. हीच ती वैदिक षड्दर्शने, अवैदिक जैन दर्शन, व अवैदिक बौद्ध दर्शने होत. अनेकातून एकत्वाकडे सहिष्णु मनाने व समन्वयवृत्तीने वाटचाल करण्याच्या भारतीय मनाच्या सवयीचे विचारसृष्टीतील हे प्राचीन काळचे उदाहरण. या वाटचालीच्या रोखानुसार वेदान्त, बौद्ध, व जैन या तीन प्रधान दिठ्ठींचे समन्वयाचे पुढचे पाऊल भारतीय विचारसृष्टीत अजून पडावयाचे आहे.

मध्ययुगीन काळात हिन्दु व मुस्लिम यांचा भीषण संघर्ष झाला. पण या भीषण संघर्षातही समन्वयाची बीजे स्पष्ट दिसतात. मुसलमान अकबराचा हिन्दु देवदेवता व देवळे यांचा सन्मान, आणि हिन्दु शिवाजीचा मशिदी व कुराण यांचा सन्मान, ही राजकारणाच्या क्षेत्रातील मुत्सद्देगिरीच्या भ्रमजालातून ठळकपणे डोकावणारी चित्तवेधक उदाहरणे आहेत. राजकारण म्हणजे युद्ध व शांती या दिखाऊ धाग्यादोऱ्यानी विणलेले मुत्सद्देगिरीचे फसवे भ्रमजाल. यात गुंतलेली राजकारणी मने ही चाणाक्षच असावी लागतात, कठोरच असावी लागतात, व ती असतातही. अशा कठोर मनोभूमिकेत साधुत्वाचा, उदारपणाचा, समंजसपणाचा ओलावा कोठेतरी कान्याकोपऱ्यात आढळेल, ही आशा करणे ही मृगजळात जळ आढळेल या आशेसारखी वेडी आशा वाटेल. पण ही आशा तशी वेडी नाही. भारतीयत्वाच्या खऱ्या संस्काराने संस्कारित राजकारणी मनाच्या मृगजळात देखील जळ आढळेल, राजकारणी मनाच्या दिखाऊ इन्द्रजालात देखील आत कोठे तरी खोलात सत्यांश आढळेल. मध्ययुगातील राजकारणाच्या संघर्षाच्या रंगभूमीवर आढळणारी ही दुर्मिळ म्हणूनच फार महत्वाची समन्वयवृत्तीची ठळक उदाहरणे आहेत. राजकारण सोडल्यास या युगातील अशी काही अन्य उदाहरणे म्हणजे अमीर खुसरोचे हिन्दवीप्रेम व हिन्दोस्तानीत्वाचा अभिमान, सूफी संतांचा, कबीराचा, गुरु नानकाचा, पंजाबी अवतारातील महाराष्ट्री संत नामदेवाचा हिन्दु–मुस्लिम भदभाव न मानण्याची वृत्ती, ही होत. या ठिकाणी महाराष्ट्र

संतपरंपरेतील एक आख्यायिका उल्लेखनीय आहे, महाराष्ट्रातील हिन्दु विठ्ठल-भक्तांच्या पंढरीने मुसलमान बादशहाला अल्लाहच्या दरगाहच्या रूपात आपले दर्शन घडवून दिले. त्यात देवत्वाची कल्पना विटाळली नाही, किंवा देवत्वाच्या कल्पनेत काही कमीपणा आला नाही. अन्यत्र अन्य वातावरणात वाढलेल्या देवत्वाच्या कल्पनेत अशा आख्यायिकेची कल्पनाही असंभाव्य आहे. दुसऱ्या देवाचे रूप घेणे म्हणजे स्वतःचे पावित्र्य विटाळले, स्वतःमध्ये काही कमीपणा आहे हे कबूल केले, असे अन्यत्र देवत्वाच्या कल्पनेत अपरिहार्यपणे मानले जाते.

आधुनिक काळात महात्मा गांधींच्या इंग्रजाविरुद्ध दिलेल्या लढ्याचा मूलमंत्र होता की इंग्रजाचा द्वेष करू नका, इंग्रजी साम्राज्यशाही मनोवृत्तीचा द्वेष करा. जगाच्या राजकारणात अन्यत्र इतिहासाच्या संदर्भात हे वेडसरपणाचे, भोळसटपणाचेच वाटेल. पण ज्या समन्वयी भारतीय संस्काराचे महात्मा गांधी हे परिपक्व फळ होते, त्याचाच तो परिणाम. मोंगलाशी प्राणपणाने लढणाऱ्या, मुसलमानाकडून हिन्दुधर्मावर होणाऱ्या अत्याचाराला विरोध करण्याचे कंकण बांधलेल्या, वीर शिवाजीच्या मनातही मुसलमान, त्यांचे कुराण, त्यांच्या मशिदी, त्यांची संस्कृती याविषयी प्रेम होतेच. त्या शस्त्रसंघर्षाच्या काळात वीराच्या मनोवृत्तीत सौम्यरूपात वस्तुवादी चौकटीत असलेल्या त्याच भारतीय समन्वयदृष्टीची महात्मा गांधींच्या आधुनिक निःशस्त्रसंघर्षाच्या काळातील साधुमनोवृत्तीतील ही विशाल आदर्शवादी अभिव्यक्ती. या भूमिकेच्या दृष्टीने त्यात वेडसर असे काही नाही. व्यवहाराला आदर्श नेहमी वेडसरच वाटतो. तसे जर वाटले नाही, तर व्यवहार हा फार उच्च आदर्शाचा तरी असला पाहिजे, किंवा आदर्श हा फारच ठेंगणा तरी असला पाहिजे. भारतीय समन्वय-वृत्तीच्या याच आदर्श दृष्टीची भारतीय विश्वकवी रविन्द्रनाथ टागोरांनी कविमनाने आणखी एक पाऊल पुढेच जाऊन काव्यरूपात विश्वभारतीच्या कल्पनेला जमेल तेवढे सत्यसृष्टीत शांतिनिकेतनमध्ये संस्थारूपात साकार करण्याचाही प्रयत्न केला.

भारतीय संस्कृतीची मूलभूत समन्वयात्मक मनोवृत्तीची ऐतिहासिक ठळक पावले वर दाखविली आहेत. भारतीय आद्य राष्ट्रभाषाकवी अमीर खुसरोत हीच वृत्ती स्पष्ट व पूर्णांशाने प्रस्फुटित झाली आहे. ही वृत्ती भारतीय आद्य विश्वकवि रवीन्द्रनाथ टागोरामध्ये आदर्श रूपात अभिव्यक्त झाली. भारतीय आद्य राष्ट्रभाषा कवी हा जीवनात भारतमय झाला. भारतीय आद्य विश्वकवी हा जीवनात विश्वमय झाला. याच भारताच्या वातावरणात राष्ट्रभाषाकवी राष्ट्रमय जीवन जगून भारताच्या राष्ट्रीयत्वाच्या स्फूर्तीचा

अनुक्रमणिका






दीपस्तंभ बनून राहिला. याच भारताच्या वातावरणात विश्वकवी विश्वमय जीवन जगून भारताच्या विश्वात्मक विराट् स्वरूपाच्या स्फूर्तीचा दीपस्तंभ बनून राहिला. हे दोन्ही दीपस्तंभ आपापल्या परीने प्रकाश देत असताना, स्वातंत्र्याच्या पहिल्या गद्धेपंचविशीतला भारत अंधकारात किती ठेचकाळत होता, हे पाहून फार दुःख वाटते.

अमीर खुसरो हा अभारतीय भारतीय. रवींद्रनाथ हे विश्वपुरुष असले तरी भारतीयच होते. ते भारताच्या राष्ट्रीयत्वापेक्षा विश्वीयत्वाचे जास्त प्रातिनिधीक होते. भारताला दोन्ही हवे. पण त्यातल्या त्यात सध्याची व विशेषतः मनाने अजून अभारतीय असणाऱ्या भारतीयांच्या भारतीयत्वाची. या ठिकाणी अमीर खुसरोचे आदर्श अभारतीय भारतीयत्वाचे उदाहरण अत्यंत स्फूर्तिप्रद ठरेल.

## हिन्दी राष्ट्रभाषेचा प्रश्न व अहिंद्यांचा निरर्थक हिन्दी विरोध

हिंदीविरोधी अहिंद्यांमध्ये तामिळनाडू अग्रणी आहे. दक्षिण हिंदुस्थानात मद्रासची " दक्षिण भारत हिंदी प्रचार सभा " ही सर्वांत जुनी संस्था तामिळ-नाडू मध्येच आहे. या संस्थेने राष्ट्रीय वृत्तीने व अत्यंत हिरीरीने हिंदीचा राष्ट्रभाषा म्हणून प्रचार करण्याचे कार्य दक्षिण हिंदुस्थानात प्रथम सुरू केले. आजतागायत या संस्थेने अत्यंत मोलाचे कार्य केले आहे. या संस्थेला सर्व दक्षिणी भाषाभाषिकांचा पाठिंबा आजवर मिळालेला आहे. त्यात विशेषतः तामिळभाषिकांचा पाठिंबा उल्लेखनीय आहे. स्वर्गीय राजगोपालाचारीसारख्या मातबर तामिळभाषिक पुढाऱ्यानीही हिंदीचे राष्ट्रभाषा म्हणून समर्थन केले होते. पण त्याच तामिळभाषिकांमध्ये आज हिंदीचे अत्यंत कडवे विरोधी निघाले आहेत. मद्रासने पूर्वी हिंदीला राष्ट्रभाषा म्हणून पाठिंबा देऊन, तिच्या प्रचारकार्याची मुहूर्तमेढ रोविली. आज त्याच मद्रासने दक्षिण भारतात हिंदीचा कडवा विरोध करण्याचे कंकण बांधले आहे. या विरोधाभासाचे मूळ पेरियार ई. व्ही. रामस्वामी नायकर यानी सुरू केलेल्या द्राविडनाड व ब्लॅकशर्टस्च्या चळवळीत आहे. ही ब्लॅकशर्टस्ची चळवळ नंतर हिंदीविरोध, उत्तरभारतीयांचा विरोध, संस्कृत भाषेचे पुरस्कर्ते व मुळातील उत्तरभारतीय म्हणून ब्राह्मणविरोध, अशा निरनिराळ्या रूपात फोफावून शेवटी 'स्वतंत्र द्राविडनाड' च्या अतिरेकी विचार सरणीत परिणत झाली. ही विचारसरणीच मुळी अतिरेकी, अवास्तव, व अराष्ट्रीय दृष्टिकोणावर आधारित असल्यामुळे द्राविडनाडी लाथ्याच्या हिंदीविरोधाला फारसे महत्व देण्याचे कारण नाही. या अतिरेकी विचारसरणीत

तथ्यांश इतकाच की तामिळ भाषा व तामिळ संस्कृति ही द्राविड संस्कृतीच्या एका विशेष प्रातिनिधिक रूपात आजही एक विशुद्ध व आगळी अस्मिता टिकवून आहे, व म्हणून त्याची विशेष दखल घेणे आवश्यक आहे.

अतिरेकी द्राविडनाडवाद्यानीच हिंदीविरोधाला विशेष धार आणली, हे खरे. त्यात त्यांचा राजकारणी उद्देश होता. आपल्या राजकारणासाठी हा मुद्दा त्यांनी पुरेपूर राबविला. याचा भरघोस राजकारणी फायदाही त्याना झाला. तरीपण ही केवळ अतिरेकी द्राविडनाडवाद्यांचीच भूमिका असे मात्र म्हणता येणार नाही. ही भूमिका सर्वच तामिळभाषिकांची आहे असे मानणे भाग आहे, कारण द्राविडनाडवाद्यांच्या तामिळभाषिक राजकीय विरोधकानीही हीच मनोवृत्ती दाखविली आहे. द्राविडनाडवाद्यांचे राजकीयच नव्हे तर त्यांच्या जातिवादी अतिरेकीपणाचे बळी असणारे त्यांचे जातीय विरोधकही हिंदीविरोधाबाबत द्राविडनाडवाद्यांशी एकमत आहेत. तामिळभाषिकांची हिंदीविरोधाची भूमिका ही अशी जास्त व्यापक आहे. या व्यापक भूमिकेची तपासणी केल्यास, त्यातून हिंदीविरोधाचा आणखी एक पैलू नजरेस पडतो. हिंदी राष्ट्रभाषा झाल्यास, अखिल भारतीय नोकऱ्यांच्या स्पर्धेत आज जे तामिळभाषिकांचे त्यांच्या अप्रतिम इंग्रजी भाषेवरच्या प्रभुत्वामुळे अग्रगण्य स्थान आहे ते हिंदीभाषिकांना गमावण्याची धास्ती तामिळभाषिकांना वाटते.

अखिल भारतीय व्यापक राष्ट्रीय भूमिकेच्या दृष्टिकोनातून पाहिल्यास, कोण्या प्रांतविशेषाच्या सांस्कृतिक अस्मितेवर आघात व्हावा अगर कोणा एका भाषाविशेषाच्या भाषिकांना अखिल भारतीय नोकऱ्यांच्या स्पर्धेत अनायास फायदा मिळावा, या दोन्ही गोष्टी गैरच आहेत. म्हणून तामिळभाषिकांना आपली सांस्कृतिक अस्मिता हिंदीच्या वरचष्म्यामुळे नष्ट होईल व आपण अखिल भारतीय स्पर्धेच्या नोकऱ्यात हिंदीभाषिकांच्या मागे पडू, अशी वाटणारी ही दुहेरी भीती गैर आहे असे म्हणता येणार नाही. आपली सांस्कृतिक अस्मिता टिकून राहावी असे वाटणे काही गैर नाही. तसेच अखिल भारतीय स्पर्धेत सर्व स्पर्धकांना समान अडचण असावी तरच ती स्पर्धा असे वाटते यातही काही गैर नाही. अशा निष्पक्ष स्पर्धेतून स्पर्धकांच्या प्रयत्नशीलतेची व बुद्धिमत्तेची परीक्षा व्हावी व अशांनाच अखिल भारतीय शासकीय सेवेतील विशेष स्थानामानाच्या व विलोभनीय सवलतीच्या नोकऱ्या मिळाव्यात असे वाटणे यातही काही गैर नाही. पण ही तामिळभाषिकांना वाटणारी दुहेरी भीती अवास्तव व अतिरंजित आहे, हे राष्ट्रभाषा होऊ घातलेल्या हिंदीचे म्हणजे खडी बोलीचे स्वरूप नीटपणे तपासून पाहिल्यास स्पष्टपणे दिसून येईल.

तामिळभाषिकांना वाटणारी ही दुहेरी भीती इतर प्रांतीयानांही थोडी फार जाणवत असली, तरी इतक्या तीव्रतेने ती जाणवत असल्याची लक्षणे काही दिसून आली नाहीत. म्हणून तामिळभाषिकांखेरीज अन्यत्र हिंदीविरोधाची मोहीम दिसून येत नाही. यामुळे सामान्य समज असा आहे की केवळ तामिळ-भाषिकच हिंदीचे विरोधक आहे व सर्व राष्ट्राचा हिंदीला पाठिंबा आहे. आणि तामिळ लोकांचे हे फक्त नोकऱ्यासाठी भांडण आहे, व त्यात तत्त्वाची विचारार्ह अशी काही भूमिका नाही, असाही समज आहे. त्यात तामिळभाषिक द्राविड-नाडवाद्यांची अतिरेकी अराष्ट्रीय विचारसरणी व हिंदीविरोधी निदर्शनाच्या तामिळनाडूमधील मर्कटचेष्टा याचीही भर पडली आहे. यामुळे सर्व तामिळ-भाषिक तेवढे अराष्ट्रवादी व देशद्रोही हा छाप त्यांच्यावर त्यांच्या हिंदी-विरोधाच्या भूमिकेवरून मारला जात आहे.

हिंदी ही आपल्या मातृभाषेपेक्षा कमी प्रतीची भाषा आहे, तिच्यापेक्षा आपली मातृभाषा श्रेष्ठ आहे, आपल्या मातृभाषेपुढे ती तुच्छ आहे, तिला राष्ट्रभाषा म्हणून डोक्यावर घेणे हे आपल्या जास्त संपन्न व प्रगल्भ मातृभाषेचा अपमान आहे, असा अभिमान बाळगणारे केवळ तामिळभाषिकच आहेत असे नाही. अन्यही आहेत. हिंदी ही दूधभैय्याची किंवा पुरभैय्याची भाषा म्हणून हिंदी भाषेची कुचेष्टा आजही मुंबईत नजरेस येते. कलकत्त्यातही हिंदीची कुचेष्टा आजही होते. पण ही कुचेष्टेची वृत्ती कुचेष्टेच्या हलक्या विनोदी स्तरा-वरच राहिली, व तिने तामिळनाडूमधील हिंदी विरोधाच्या मोहिमेसारखे इतके तीव्र स्वरूप धारण केले नाही. याचे कारण असे की इतर प्रांतीय सांस्कृतिक अस्मितेच्या आगळेपणाची जाणीव तामिळभाषिकाइतकी इतरांना भासत नाही. इतरांचे म्हणजे आर्यभाषाभाषीयांचे जीवनही सांस्कृतिक दृष्टया हिंदीभाषिकांच्या जीवनाहून फारसे तीव्रतेने जाणवण्यासारखे भिन्न नाही. म्हणून इतराना आपली सांस्कृतिक अस्मितेची भिन्नता द्राविड संस्कृ-तीच्या सर्व द्राविडभाषीयामध्ये द्राविड संस्कृतीचे विशुद्ध रूपात सर्वात जास्त प्रतिनिधित्व करणाऱ्या तामिळभाषिकाइतकी तीव्रतेने जाणवत नाही. संस्कृति-भिन्नत्वाची छाप भाषेवरही आहे. इतर आर्यभाषाभाषीयांना हिंदी भाषा ही व्याकरण, वाक्प्रचार, व शब्दसंग्रह याबाबत जितकी जवळची वाटते म्हणून शिकण्यास सोपीही वाटते, तशी तामिळभाषिकांना तितकी जवळची वाटत नाही व म्हणून त्याना शिकण्यास फार अवघड वाटते. इंग्रजी भाषा ही सर्वांना समान परकीय भाषा व म्हणून सर्वांना शिकण्यास सारखीच अडचणीची आहे. पण हिंदी भाषा केवळ तामिळभाषिकांनाच शिकण्यास सर्वात जास्त अवघड आहे.

म्हणून अखिल भारतीय शासकीय सेवेच्या स्पर्धेची भाषा हिंदी होऊ नये, वा राष्ट्रीय जीवनात ती राष्ट्रभाषा म्हणून विशेष मानाची मानली जाऊन आमचे महत्व टिकविण्यासाठी व प्रतिष्ठाप्राप्तीसाठी सर्वांना तिच्यावर प्रभुत्व मिळविणे आवश्यक वाटावे इतके महत्व हिंदीला येऊ नये, यासाठी तामिळभाषिकांचे हिंदी राष्ट्रभाषा होऊ नये म्हणून इतके अकांडतांडव चालले आहे. याखेरीज इंग्रजीच्या प्रभुत्वामुळे तामिळभाषिकांना इतरांच्यापेक्षा तुलनात्मक दृष्टीने केन्द्रीय सेवेत नोकऱ्यांचा फायदा जास्त झाला आहे. जवळ जवळ त्यांचा एक परंपरागत मक्ताच चालत आला आहे. पण तो प्रयत्नशीलतेच्या व बुद्धिमत्तेच्या जोरावर. प्रयत्नवादी व बुद्धिमानाला निष्पक्ष स्पर्धेचा अवसर मिळू नये हे राष्ट्रहिताचे आहे, असे कोणालाही वाटणार नाही. अशा या सांस्कृतिक, भावनिक, व आर्थिक गुंतागुंतीच्या हितसंबंधामुळे तामिळभाषिकामध्ये हिंदी विरोधाचे तुफान विशेष उफाळून वर आले. अन्यत्र अशा हितसंबंधाची जाणीव इतक्या तीव्रतेची नसल्यामुळे, इंग्रजी जाऊन हिंदी आले तर इतरांना त्याचे फारसे वाटत नाही. उलट परक्याची भाषा गेली व एक देशी भाषा राजभाषा म्हणून आली असे एक स्वप्निल आदर्शवादी देशाभिमानाच्या भावनेस इतरांच्या अंतःकरणात समाधान लाभते. इतराना त्यांच्या उच्च भावनेच्या स्वप्निल भूमिकेतून तामिळभाषिक हे स्वार्थी व देशद्रोही वाटतात.

हा जसा तामिळभाषिकांविषयी इतरांचा गैरसमज आहे, तसाच तामिळ-भाषिकांचाही हिंदीविषयी गैरसमज आहे. तामिळभाषिकांची हिंदीविरोधाची भूमिका ही काही अवास्तव अतिरंजित भीतीच्या पोटीच जन्मास आली आहे. ही भीती काही अंशी योग्य असूनही, व याला हिंदीभाषिकही काही अंशी जबाबदार असूनही, हिंदी ही राष्ट्रभाषा ज्या स्वरूपात होऊ घातली आहे व ज्या स्वरूपात काही पथ्ये पाळून ती राष्ट्रभाषा होईल अथवा, व्हावी, त्या तिच्या स्वरूपाच्या पुढे विवेचनात तामिळभाषिकांची भीती अनाठायी आहे हे दिसून येईल.

संदर्भ टीपा:

१. यात अल्लाउद्दीन खिलजीच्या चित्तोड हल्ल्याच्या प्रसिद्ध "पद्मिनी" प्रकरणाचा उल्लेख नाही.

२. खुसरोचे फारसी काव्य चार विभागात विभक्त केले जाते-ऐतिहासिक मस्नवी, रोमँटिक मस्नवी, दीवान, व मिश्र रचना. पहिल्या भागात

किरानुसादैन, निपत्तुल फतह देवलरानी खिज्रखाँ, नुहस्सिपर, व तुगलकनामा यांचा समावेश केला जातो. दुसऱ्या भागात मल्लोल अनवर, शिरीन खुसरो, आईन–ए–सिकन्दरी, मजन–लैला, व हश्त बिहश्त यांचा समावेश होतो. तिसऱ्या भागात तुहफतुस्सिगर, वास्तुल हयात, आदि ग्रंथ येतात. चौथ्या भागात वेदऊल अजाइब, मस्नवी शहर असुब, चिश्तान, व खालिकबारी, हे ग्रंथ मोडतात. यामध्ये 'देवलरानी खिज्रखाँ' ही अल्लाउद्दीन खिलजीच्या शासनाच्या अंतिमकाळी लिहिलेली ऐतिहासिक मस्नवी फार प्रसिद्ध आहे. खुसरोला 'अमीर' ही पदवी ज्या सुलतान जलालुद्दीन खिलजीने दिली होती त्याच सुलतानाची स्तुति वरील 'मिपत्तुल फतह' मध्ये आहे.

३. "खुसरो की भाषा खडी बोली है। इसमें बनावटीपन नहीं है, न अपभ्रंश का प्रभाव है, न अन्य बोलियों का अनवश्यक मिश्रण। दिल्ली के समीप की दैनिक भाषा का प्रयोग किया गया है।" ( डॉ. गुणानन्द जुयाल : हिन्दी भाषा का उद्गम और विकास, आगरा, पृ. ४९ ).

४. "पश्चिम आजि खुलियाछे दुयार,
जेथा हते आने सबे उपहार,
मिलाबे, मिलिबे, जाबे ना फिरे।"

रवीन्द्रनाथ टागोर

५. "कुरान शरीफमें बलात् धर्मांतरण का विरोध किया गया है। कुरान शरीफ में कहा गया है कि जो मुसलमान इस्लामविरोधी कार्य करता है। उसको उचित दंड दिया जाना चाहिये। उक्त विचार अलीगढ़ विश्वविद्यालय के मुक्ती तथा धार्मिक शिक्षा विभाग के प्रमुख अब्दुल कयूम ने गत रात यहाँ इस्लाम के प्रथम खलीफा हजरत अबू बकर सिद्दीकी की पुण्यतिथि पर आयोजित समारोह में प्रगट किये। उन्होने कहा कि साप्रदायिकता का त्याग कर प्रत्येक मुसलमान को रचनात्मक काम करना चाहिये ताकि देश का भला हो तथा व्यक्ति का पारलौकिक जीवन सुधारें।" ( नवभारत, भोपाल दिनांक २८ जून १९७६ ).

६. या लेखकाच्या "Philosophy In Brazil" ( Journal of Indian History, University of Kerala, Trivandrum, Kerala State, Aug. 1958 ) ब्राझीलमधील जवळ जवळ सर्वच ब्राझीलियन् अब्राझिलीय मूलाचे असूनही, ब्राझीलमधील जवळ जवळ सर्वच सांस्कृतिक–राष्ट्रीय पिंडाची सामुग्री बाहेरच्यानी आणलेली असूनही, ब्राझीलियनांच्या ब्राझीलियत्वाच्या भावनेचे उदाहरण पाहा.

७. "राष्ट्रपति श्री. फखरुद्दीन अली अहमदने आज यहाँ "इस्लाम का आधुनीकरण" करने का आव्हान करते हुए कहा कि यह कार्य विद्वान मुसलमानों एवं उलेमाओंको करना होगा, जिन्हें कुरानका गहन अध्ययन है। आपने कहा कि मुसलमानों का स्थिर एवं संकीर्ण दृष्टिकोण नहीं होना चाहिये अन्यथा न तो हम इस्लाम की सेवा कर पायेंगें और न भारत की। राष्ट्रपति ने ये शब्द दक्षिण भारत शिक्षा ट्रस्ट की एक बहुमंजिली इमारत का शिलान्यास करते हुए व्यक्त किये हैं। राष्ट्रपतिने कहा कि जहाँ तक आर्थिक एवं राजनीतिक दायरोंका प्रश्न है, न केवल मुसलमान बल्कि अन्य धर्म के अनुयायी भी अपने धर्म को भूल चुके हैं। आपने कहा "हम भारत के नागरिक के नाते अपने अधिकारों को सोचें तथा फिर अपने कर्तव्य को निबाहें। राष्ट्रपति ने कहा कि देश की प्रगति उसके सभी नागरिकोंकी प्रगति है चाहे वे किसी धर्म को भी मानते हो। आपने कहा कि हमारा प्रथम कार्य गरीबी निरक्षरता तथा अज्ञानता को दूर करना है तथा मुसलमानों को यह नहीं समझना चाहिये कि इस देश में उसके लिए कोई काम नहीं है। क्या आप इस देशमें पैदा नहीं हुए, पाले पोसे नहीं गए, और क्या आपके मित्र एवं रिश्तेदार इस देश में नहीं हैं ? आपने पूछा।

श्री अहमदने कहा कि किसी भी इस्लामिक किताब में मुसलमानों के लिए अलग देश की बात नहीं कही गई है। "हम ने एक बार गलती की है। आपने कहा कि वे लोग कह ते थे कि उनके देश में मुसलमानों को स्वर्ग दीखेगा। किन्तु क्या उन्हें स्वर्ग दीखा ?" आपने पूछा।

इस ट्रस्ट के श्री अहमद बशीर ने अपने स्वागत भाषण में जो मुस्लिम वैयक्तिक कानून का प्रश्न उठाया उसके संदर्भ में राष्ट्रपतिने कहाँ "मै नहीं जानता कि ऐसे आयोजनों पर यह बात क्यों उठाई गई। ये बातें तो साम्प्रदायिक संगठनों द्वारा वोट प्राप्त करने के लिये की जाती है" ( नव भारत, भोपाल दिनांक १७-४-७६ ).

"हेथाय आर्य हेथा अनार्य,  
हेथा द्राविड चीन,  
शक हूण दल पाठान मोगल,  
एक देहे हल चीन,  
पश्चिम आणि खुलियाछे दुयार,  
जेथा हते आने सबे उपहार,  
मिलाबे, मिलिबे, जाबेना फिरे।"

रवीन्द्रनाथ टागोर

अनुक्रमणिका






९. Internationalism, Supernationalism, Non-nationalism यासारख्या विविध प्रचलित आंतरराष्ट्रीयत्व वा वैश्विकतेच्या संकल्पनांची (concepts) चर्चा करून रवीन्द्रनाथ टागोरांच्या वैश्विकतेच्या संकल्पनेच्या आगळेपणाचे वैशिष्टच या लेखकाने दाखवून दिले आहे, व इतर संकल्पनांपेक्षा टागोरांची संकल्पना कोणत्या दृष्टीने व कोणत्या अर्थाने श्रेष्ठ मानली जाऊ शकते हेही दाखवून दिले आहे. या लेखकाचा रवीन्द्र जन्म शताब्दीनिमित्त लिहिलेला लेख "Rabindranath Tagore: La unika Mond-Homo" "OOMOTO" (Kameoka, Japan, may-June 1963, 25 th year, No. 275-276) मध्ये पाहा.





अनुक्रमणिका








प्रा. व दा. कुलकर्णी

# महानुभाव पंथ आणि त्याचे वाङ्मय

---

डॉ. शं. गो. तुळपुळे हे प्राचीन मराठी साहित्याचे नाणावलेले अभ्यासक आहेत. 'महाराष्ट्र–सारस्वता'च्या पुरवणीच्या निमित्तानेच त्यांनी महानुभाव वाङमयाचा अभ्यास केला आहे, असे नाही तर 'दृष्टान्तपाठ', 'लीळाचरित्र', 'ऋद्धिपूर वर्णन' या अस्सल साधनसामुग्रीच्या चिकित्सक व विवेचक संपादनातूनही त्यांच्या शिस्तबद्ध अभ्यासाचा प्रत्यय येतो. 'महानुभाव पंथ आणि त्याचे वाङमय' या त्यांच्या नुकत्याच प्रसिद्ध झालेल्या ग्रंथावरून त्यांच्या कुशाग्र बुद्धिमत्तेची, सखोल व्यासंगाची आणि रसिकतेची चमक–झलक दिसून येते.

महानुभाव वाङमयाचे ज्येष्ठ व श्रेष्ठ जाणकार डॉ. वि. भि. कोलते यांनी या ग्रंथाला प्रस्तावना लिहून त्याची मुक्तकंठाने प्रशंसा केली आहे. हे करीत असताना डॉ. कोलते यांनी प्रामाणिक मतभेदही (स्वतःच्या सौजन्याला धक्का न लावता) निदर्शनास आणले आहेत. महानुभाव तत्त्वज्ञानानुसार श्रीदत्तात्रेयाचे अवतारित्व, महानुभावांचा समतावाद, महानुभावांच्या अप्रियत्वाबाबत 'तारीखे अमजदी' ची त्यांनी काढलेली साक्ष आणि श्रीसर्वज्ञ चक्रधराच्या 'उत्तरापंथे गमना' संबंधी उठलेले 'विरोधाचे वादळ' ही मतभेदाची प्रमुख स्थळे आहेत. योग्यवेळी व योग्यठिकाणी डॉ. कोलते त्यांचा परामर्श घेणार असल्याचे त्यांनी अभिवचन दिल्यामुळे त्यावर अधिक भाष्य करण्याची गरज नाही. ग्रंथाच्या पहिल्या भागातून महानुभाव तत्त्वज्ञानाचा साधार व थोडक्यात सुंदर परिचय होतो. अनादी चारी पदार्थ, जीवाचे स्वरूप, ब्रह्मांडातील एकूण देवता, त्यांचे उच्च नीचत्व, त्यांचे थोवे, कार्य व कारण-प्रपंचाचे अष्टधा प्रकृतीशी असलेले संबंध, परमेश्वर व त्याचे जीवोद्धरणाचे कार्य, महानुभावांची परमेश्वरविषयक अवतारकल्पना, ज्ञान आणि भक्ति-मार्ग या संबंधीचे सारे विवेचन साधार आणि विचक्षणपणे केलेले आहे. डॉ. कोलते

अनुक्रमणिका






यांच्या 'महानुभाव तत्त्वज्ञान' आणि 'महानुभावांचा आचारधर्म' या ग्रंथांच्या छायेत ही प्रकरणे वावरत असली तरी अभ्यासकाना महानुभाव तत्त्वज्ञानाची साररूपाने सुंदर ओळख होते. 'महानुभावाची आचार-संहिता' हेही प्रकरण साधार असून तत्त्वज्ञानाचा रुक्षपणा कोठेही आढ-ळत नाही. 'विकारविकल्पशून्यत्व', 'स्वभावत्व', 'निरालंबित्व' 'देवता-स्मरण', 'जन्मक्षेपण' ही 'असती परी'ची लक्षणे अनेक स्पष्टीकरणासह वेचली आहेत. हे विवेचन करीत असताना 'वस्तु स्मरण' आणि 'मूर्तिस्मरण' यात डॉ. कोलत्यांच्या मताशी ते सहमत झाले नाहीत. 'मूर्ति' ही देहधारी असून 'वस्तु' ही चिन्मय होय हा विचार डॉ. कोलते यांच्याशी मतभेद दर्शवून डॉ. तुळपुळे यांनी चिकित्सकरीत्या मांडला आहे. पंथीय तत्त्वज्ञानाला बाध येऊ न देता पंथीय पुराणाच्याच आधारे त्यांनी आपला दृष्टिकोण स्पष्ट केला आहे, हे विशेष प्रसंगी भागवत संप्रदायातील विचारांचाही तुलनात्मक विचार त्यांनी सादर केला आहे. प्रकरण ३ व ४ यात महानुभाव तत्वज्ञानाचे सार उत्कृष्टपणे उतरले आहे, यात शंका नाही.

महानुभाव तत्त्वज्ञानात शिरण्यापूर्वी पंथाचे स्वरूप, पंथाच्या इतिहासाची रूपरेषा, पंचकृष्णांचा परिचय व त्यांचा परस्पर संबंध, पंथाचे आद्य आचार्य व त्यांचे कार्य, आम्नायनिर्मिती, ओटयाची बांधणी, महानुभावांची तीर्थस्थाने, सांकेतिक लिपींची निर्मिती व त्याची कारणे यांचा परामर्श डॉ. तुळपुळे यांनी घेतला आहे. पंचकृष्णांचा त्यांनी करून दिलेला परिचय उद्‌बोधक असला तरी महानुभावांच्या अवतारकल्पनेच्या तात्त्विक भूमिकेसंबंधी चर्चा झाली असती तर अधिक चांगले झाले असते. ती अपेक्षा ठेवणे चूक ठरू नये. महानुभावांच्या तीर्थस्थानांचा परिचय अत्यंत त्रोटक दिला आहे. 'तीर्थमालिका', स्थानपोथी आणि पंथात प्रचलित असलेला तीर्थस्थानाचा नकाशा यांचा उपयोग केला असता तर अधिक स्पष्ट कल्पना आली असती. महानुभावांच्या विविध आम्नायाची माहिती डॉ. तुळपुळे यांनी करून दिली आहे. आम्नायांची नोंद करून उपाध्ये आणि कवीश्वर या दोन प्रमुख गटात समाविष्ट होणाऱ्या आम्नायांवर लक्ष केंद्रित केले आहे. (पृ. ५७-६०). हे करीत असताना उपाध्येआम्नायातील जवळपास २५ ग्रंथाचे कर्तृत्व असलेला समर्थ कवी डिंभ मुनी कृष्णदास (कवी डिंभ कृष्णमुनी विराटदेशे) या कवीचा उल्लेखही नाही. (पृ. ५९). वाङ्मय विभागातही त्याच्या 'रुक्मिणी–स्वयंवर', 'ऋद्धिपूरवर्णन', 'साधनामृतस्त्रोत्र', 'आत्मतीर्थप्रकाश व वृद्धाचार' यांचेच उल्लेख आहेत. वस्तुत: 'श्रीकृष्णजन्माष्टमीव्रताख्यान', 'वाकी माहात्म्य',

'चेंडुफळी', 'लक्ष्मणा–स्वयंवर' हे ग्रंथ प्रकाशित झालेले आहेत. त्यांचा उल्लेख डॉ. तुळपुळे यांनी केला नाही. भारतातील दत्तसंप्रदाय हा पौराणिक असला तरी महाराष्ट्रात दत्तसंप्रदायाची प्रतिष्ठापना करण्याचे श्रेय महानुभाव पंथाला द्यावे लागते, हे डॉ. तुळपुळे यांचे मत चिंतनीय वाटते. (पृ. ५). प्राचीन मराठी साहित्येतिहासाचा पुरावा द्यावयाचा झाला तर शके १११० तील 'विवेक सिंधु' या ग्रंथाचा देता येईल.

ना तरी श्रीदत्तात्रेयो मुनिश्वरु । जो महाविष्णुचा अवतारु ।
तेण्हें प्रसन्न केला श्रीहरु । गौतमी तीरीं ॥ (वि. सि. १८.४८)

या ओवीवरून महाराष्ट्रातील दत्तसंप्रदायाच्या प्रतिष्ठापनेचा मागोवा घेता येईल. 'तीन शिरें सहा हात' हा महानुभावांचा दत्त नसून तो एकमुखी आहे, एवढेच त्याचे वैशिष्ट्य नाही. एकमुखी दत्ताची कल्पना केवळ महानुभावांचीच नाही. महानुभावमार्गास श्रीदत्तात्रेय प्रभु 'आदीकारण' आहेत, हे मात्र खरे.

महानुभावमार्गास श्रीदत्तात्रेयप्रभु आदिकारण आहेत, तसेच डॉ. तुळपुळे म्हणतात त्याप्रमाणे 'या साहित्यासि श्रीचक्रधरु आदिकारण' आहेत. ग्रंथाच्या दुसऱ्या विभागात या साहित्याचा त्यांनी साहित्यप्रकारानुसार आढावा घेतला आहे. अर्थात तो त्या साहित्याचा कालक्रमानुसार 'इतिहास' नव्हे.

डॉ. तुळपुळे यांनी अद्ययावत प्रकाशित ग्रंथांची, मर्यादित अर्थाने, नोंद घेतली असली तरी डॉ. कोलते यांनी प्रस्तावनेत म्हटल्याप्रमाण अधिक साक्षेप दाखविला नाही, हेही तितकेच खरे आहे. कवी डिंभाच्या ग्रंथासंबंधी उपरोक्त विवेचन आलेलेच आहे. श्री ज्ञानेराज शिष्य विद्वांसकृत, 'श्रीनागींद्राचार्य महापूजा वर्णन' या ग्रंथाची ओळख करून दिली. (पृ. १६८). परंतु १९७३ साली प्रकाशित झालेल्या डॉ. अण्णासाहेब अडसोडसंपादित ज्ञानेराज विद्वांस-कृत 'श्रीनागींद्राचार्य महापूजा वर्णन' हा ग्रंथ त्यांच्या अवलोकनात आला असता तर या दोन भिन्न कवींची व त्यांच्या भिन्न काव्यकृतींची अधिक चिकित्सा करणे शक्य झाले असते. भक्तिरसपूर्ण असलेले दाइंबाकृत 'निर्वेद-स्तोत्र' हे आर्त अंतःकरणाचे उत्कट उद्गार आहेत. 'मराठी संशोधन पत्रिके'-तून (जानेवारी १९७२) ते प्रकाशित झाले आहे. त्याचाही परामर्श अनव-धानाने राहून गेला असावा. तसेच श्री सर्वज्ञ चक्रधराच्या सान्निध्यात आलेले पहिले शिष्य नीळकंठ भांडारेकर यांनी त्यांना इंगळी चावली असता होणाऱ्या असह्य वेदनेतून मुक्तता होण्यासाठी श्रीसर्वज्ञांच्या अनुमतीने त्यांचे स्तुतिस्तोत्र गायिले. 'विंगुळिका स्तोत्र' या नावाने पंथात ते प्रसिद्ध आहे. महानुभाव

साहित्यातील, संस्कृतमध्ये असले तरी, पहिले स्तोत्र आहे. श्री. चंद्रकान्त निम्भोरकर यांनी ते संपादित केले असून १९७० मध्ये प्रकाशित झालेले आहे. तसेच भाष्यग्रंथावरील प्रकरण अपुरे वाटते. डॉ. कोलतेसंपादित 'आचार-बंद' हे क्रमशः प्रकाशित होत असले तरी माधवराज पंजाबी यांनी लक्षणस्थळ महाभाष्य, आचारमालिकामहाभाष्य, विचारमालिकामहाभाष्य आदी भाष्य-ग्रंथ प्रकाशित केले आहेत. महावाक्यनिरूपणमहाभाष्य हे सकळ लिपीत छापलेले आहे. या सर्वांचा परामर्श घेणे सहज शक्य होते. भाष्यग्रंथ या प्रकरणातील ही उणीव प्रकर्षाने जाणवते. उपाध्येआम्नायातील शाङ्र्गधर भोजनेकृत 'तीर्थमालिका' हे विविधवृत्तात्मक काव्य लीळाचरित्रातील स्थान-माहात्म्यावर आधारित आहे. हे काव्य प्रा. सौ. कांचनमाला हरमळकर यांनी संपादित केले असून 'मराठी संशोधन पत्रिका', जानेवारी १९६७, यातून प्रकाशित झाले आहे. त्याचाही निर्देश डॉ. तुळपुळे यांच्या ग्रंथात आढळत नाही. अत्यंत साक्षेपी म्हणून लौकिक असलेल्या डॉ. तुळपुळे यांच्या हातून निसटलेले हे काही दुवे. पंथाचा पंजाबात प्रवेश (पृ. ६८–६९) या उपशीर्षकाखाली महानुभावांच्या पंजाबनिवासासंबंधी विचार आलेला आहे. महानुभावपंथियांनी पंजाबात लोकोत्तर कार्य केलेले आहे. जयकृष्णीधर्माचा प्रचार व प्रसार त्यांनी निष्ठेने केला आहे. एवढेच नाही तर तेथे हिन्दी, उर्दु, पंजाबी भाषांतूनही साहित्य निर्माण झाले आहे. पं. चक्रधारी 'बेजर' यांनी रचिलेले पंजाबी भाषेतील 'श्रीचक्रधर चरित्र' काव्य देवनागरी लिपीतून म. कृष्णदास महानुभाव यांनी आध्यात्मिक साहित्य प्रकाशन या संस्थेतून प्रकाशित केले आहे. ते बहुधा डॉ. तुळपुळे यांच्या अवलोकनात आले नसावे.

'सातीग्रंथां'संबंधी एक स्वतंत्र प्रकरण या ग्रंथात आहे. 'शिशुपालवध' आणि 'वछाहरण' या दोन महत्त्वाच्या ग्रंथनिर्मितीकालासंबंधी वाद आहे. डॉ. कोलते यांनी मान्य केलेले शककाल देऊन डॉ. तुळपुळे मोकळे झाले. क्वचित ठिकाणी विरोध दर्शविला, पण चर्चा टाळली. म. आराध्य मुरलीधर-शास्त्री यांनी नुकत्याच प्रस्थापित केलेल्या शककालाची त्यांना जाण आहे. तो निर्देश पृ. १९५ च्या तळटीपेत नोंदवून डॉ. तुळपुळे यांनी स्वतःची सोडवणूक करवून घेतली. त्यांच्याकडून यासंबंधी अधिक चिकित्सेची अपेक्षा होती, ती पूर्ण होऊ शकली नाही. त्याचप्रमाणे 'स्मृतिस्थळ' हा ग्रंथ नरेन्द्रकृत आहे का यासंबंधी 'साच आणि लटिके' त्यांनी पारखले. पण त्यासंबंधी स्वतःचे स्पष्ट मत कोठेही दर्शविले नाही. ( पृ. १६३–१६५ ). डॉ. तुळपुळे यांच्या लेखनात

अनवधानाने एक महत्वाची चूक घडलेली आहे. पृ. १७५ वर नागदेवाचार्यांच्या सहवासात केसोबासांना 'तृतीय सिंग, निघाल्याची 'स्मृतिस्थळा'तील ११६ व्या स्मृतीतील आख्यायिकेचा निर्देश ते करतात. वस्तुतः ही आख्यायिका केसोबासासंबंधी नाही, तर ती कवीश्वराचार्य भास्करभट्ट बोरीकरांसंबंधी आहे. कवीश्वरबासाचे पूर्वाश्रमीचे गुरू केशवाचार्य त्यांना उपहासाने 'तृतीय सिंग' निघाल्याचे म्हणाले होते. याच प्रकारच्या अनवधानाने काही तळटीपा देण्यात विस्कळितपणा आलेला दिसतो.

पृ. ८ वरील तळटीप अनावश्यक आहे. कारण मुळातच ते वचन उद्धृत केलेले आहे. मुद्रणातील दोष म्हणून सांगायचे झाले तर पृ. २८ वरील तळटीप पृ. २७ वर हवी होती. पृ. १०१ वरील तळटीप पृ. १०२ वर आली आहे. पृ. १३५ वरील तळटीप विस्कळित ठरते. अर्थात हे सर्व दुर्लक्षण्याजोगे आहे.

महानुभाव पंथ आणि महानुभाव वाङमय या संबंधी विवेचन करणारा ग्रंथ लिहून महाराष्ट्र सारस्वताची फार मोठी उणीव डॉ. तुळपुळे यांनी भरून काढली आहे. डॉ. तुळपुळे हे व्यासंगी आहेत, चिकित्सक संशोधक आहेत, साक्षेपी विवेचक आहेत, भाषापंडित आहेत आणि सर्वात महत्वाचे म्हणजे रसिक आहेत. संपूर्ण ग्रंथ त्यांच्या रसाळ वाणीने फुलला आहे. महानुभाव पंडिताच्याच भाषेत सांगायचे झाले तर.

भणौनि शब्दरत्न सोहज्वळा, जाउनी साहित्याचिया वेलाउळा, भरुनी आणूं खोळा, उन्मेखाचिया ॥

ही कामगिरी डॉ. तुळपुळे यांनी यशस्वीपणे पार पाडली आहे.

'महानुभाव पंथ आणि त्याचे वाङमय', डॉ. शं. गो. तुळपुळे; व्हीनस प्रकाशन, पुणे १९७६; पृष्ठे : वीस + ३५५.

◆ ◆ ◆

अनुक्रमणिका

डॉ. ह. धी. सांकलिया

# लोहयुग आणि भारतीय युद्धाचा काळ

नवभारत आक्टोबर १९७६ च्या अंकात डॉ. वा. वि. मिराशी यांनी भारतीय युद्धाच्या कालावर एक लेख लिहिला आहे. या विषयाकडे माझे लक्ष Indian Express चे पुण्याचे वार्ताहर श्री. कर्दळे यांनी पुन्हा एकदा वेधले. आणि त्यांनी मला या विषयावर माझा अभिप्राय कळविणेस सांगितले. त्यांनीच माझ्याकडे नवभारत आणि लोकसत्तेचा अंक पाठवून दिला. त्यांचे मी येथे आभार मानतो. कारण ही दोन्ही माझ्या नेहमीच्या वाचनात येत नाहीत. माझे मत देण्याच्या अगोदर येथे हे सांगितले पाहिजे की, डॉ. मिराशी यांनी जो लेख लिहिला आहे त्यात नवीन काही नाही. कारण ५० वर्षांपासून यावर अनेक विद्वानांनी आपापली मते दिली आहेत. अगदी अलीकडे दिवंगत डॉ. अळतेकर आणि डॉ. पुसाळकर यांनी या विषयावर मत प्रदर्शित केले होते. भारतीय विद्याभवनने प्रसिद्ध केलेल्या Vedic Age नावाच्या पुस्तकाच्या ६ व्या आवृत्तीत याचा परामर्श घेतला आहे.

या दोन विद्वानांनी जेव्हा त्यांची मते मांडली तेव्हा पुरातत्त्वाच्या साहाय्याने या विषयावर आम्ही जे काही आता सांगू शकतो ते सांगण्याची त्यावेळी शक्यता नव्हती. डॉ. मिराशींनी पुरातत्त्वीय पुराव्याचा उल्लेख केला आहे परंतु त्यांना तो मान्य नाही. माझा उद्देश येथे समर्पक उत्तर देण्याचा आहे.

या विषयावर तीन तऱ्हेचे पुरावे आहेत. एक साहित्यिक, दुसरा पुरातत्त्वीय आणि तिसरा वास्तविकतेच्या दृष्टिकोणातून. साहित्यावर आधारित जी चर्चा डॉ. मिराशींनी केली आहे त्यावर मी एवढेच सांगू इच्छितो की, ऋग्वेदाचा काळ अजून निश्चित झालेला नाही. डॉ. पुसाळकरांच्या मते महाभारताचे युद्ध इ. स. पू. १४ व्या शतकात झाले होते परंतु ज्या Vedic Age मध्ये पुसाळकरांनी ही चर्चा करून अभिप्राय दिला आहे त्यातच ऋग्वेदाचा काळ भाषाशास्त्राच्या दृष्टीने डॉ. बटूकृष्ण घोष यांनी इ. स. पू. १००० असा निश्चित केला आहे. दुसरे म्हणजे ऋग्वेदात अयस् धातूचा उल्लेख आहे. त्याचा अर्थ लोह नसून ताम्र असावा असे डॉ. दांडेकरांसारख्या विद्वानांना वाटते. ही दोन

मते ग्राह्य धरली तर अयस् इत्यादींचा उल्लेख आणि महाभारत युद्धाचा काळ याकडे आपले लक्ष वेधले आहे ते इ. स. पू. १००० नंतर असावे.

महाभारताच्या युद्धाचा काळ, त्या युद्धात ज्या राजांनी भाग घेतला त्यांच्या राज्याचे आणि सैन्याचे प्रमाण आणि त्यांनी जी शस्त्रे वापरली त्यांचा वास्तविकतेतून विचार करून येथे मी वाचकांसमोर जो काही निष्कर्ष निघतो, तो ठेवत आहे.

प्रथम आपण ऋग्वेदाचा काल इ. स. पू. २५०० धरून आणि त्यातील अयस् शब्दाचा अर्थ तांबे आहे असे गृहीत धरून महाभारत युद्धावर काय प्रकाश पडतो ते पाहू. या विषयावर महाभारत जे काही राजकीय वर्णन देते ते आपल्याला थोडा वेळ बाजूला ठेवावे लागेल आणि मागील २५ वर्षात पुरातत्त्वाच्या सहाय्याने जो पुरावा उपलब्ध झाला आहे तो पहावा लागेल.

१९२३ पासून १९७३ पर्यंत उत्तर आणि पश्चिम भारतात कमीतकमी २५ ते ३० उत्खनने झाली आहेत. त्यात अफगाणिस्थान, सौराष्ट्र, दक्षिण गुजरात, सिंध, पंजाब आणि दिल्ली एवढ्या मोठ्या क्षेत्रात सिंधू संस्कृती आणि त्या पूर्वीची संस्कृती अस्तित्वात होती असे दिसून आले. याचा काळ इ. स. पू. ३००० ते इ. स. पू. १५०० होता आणि हा काळ कार्बन १४ पद्धतीने निश्चित केलेला आहे, या पद्धतीत कमीतकमी ५० नमुन्यांचा उपयोग काल ठरविण्यास केलेला आहे. ज्या ठिकाणी उत्खनने झाली आहेत त्यापैकी गुमला ( N. W. F. P. ), हराप्पा, मोहेंजोदारो, रंगपूर, लोथल, कालिबंगन, रुपर, भगवानपुरा या ठिकाणी खालील थरात सिंधु संस्कृतीचे अवशेष मिळाले आणि त्यावरच्या थरात लोह मिळाले. या वरच्या थराचा काल कार्बन १४ पद्धतीने आणि जेथे ती उपलब्ध नव्हती तेथे नाणी ( मोहेंजोदारो ) इत्यादी साधनांनी निश्चित केला आहे. आणि तो इ. स. पू. ५ व्या शतकाच्या मागे जात नाही.

सिंधु संस्कृतीत ज्या वस्तू मिळाल्या आहेत त्यांचे सांस्कृतिक महत्त्व सर्वांना माहिती आहेच. तरीही त्यात तांब्याची जी आयुधे आणि हत्यारे आहेत ती विशेष पाहण्यासारखी आहेत. ती शस्त्रे हातात धरण्यासाठी खास मूठ तयार केलेली नाहीत. त्यामुळे ती प्राथमिक स्वरूपाची वाटतात. याबरोबर असंख्य दगडी पाती आणि लढण्यासाठी मातीचे मुद्दाम बनविलेले अनेक गोटे होते.

ह्या संस्कृतीत नगरे आणि खेडी दिसून येतात, आणि त्यामध्ये वाहतुकीसाठी बैलगाडीचा वापर केला जाई. त्या बैलगाड्यांची चाके सध्याच्या चाकांसारखी नसून भरीव होती त्याच्या मध्ये आरे ( spokes ) नव्हते.

घोड्यांचा वापर सर्रास होता किंवा नाही हे सांगता येत नाही. परंतु घोड्याच्या अस्थि सूरकोटडा ( कच्छ ) येथे उत्खननात मिळाल्या आहेत.

वरील उत्खननांव्यतिरिक्त महाराष्ट्रात नासिक, नेवासा, जोव, चांडोली, सोनगांव, इनामगाव, तेर, भोकरधन आणि नागपूरजवळ दोन तीन ठिकाणी उत्खनने झाली. तसेच गुजरातमध्ये रंगपूर, सोमनाथ, द्वारका, वडनगर, बडोदा; आंध्रमध्ये नागार्जुनकोंडा, कर्नाटकात संगन आणि कल्लु, टेक्कलकोटा, चंद्रावल्ली, ब्रह्मगिरी, हल्लूर; बंगालमध्ये राजरधिपी, बिहारमध्ये राजगीर, चिरांद; उत्तर प्रदेशात कौशांबी, मथुरा, हस्तिनापुर; मध्यप्रदेशात महेश्वर, नावडाटोली, उज्जैन, कायथा, व राजस्थानात आहड इत्यादी ठिकाणी उत्खनने झाली या सर्व उत्खननात लोह वरच्या थरात मिळाले आहे आणि कार्बन १४ पद्धतीने या थराचा काळ इ. स. पू. ४०० ते ८०० असा आहे. अतरंजीखेड (उ. प्रदेश) या एकाच ठिकाणी लोहाबरोबर कोळसेही मिळाले आणि त्याचा कार्बन १४ पद्धतीने इ. स. पू. ११०० हा काळ ठरला. म्हणजे भारतात इ. स. पू. ११०० च्या पूर्वी लोह मिळत नाही.

यावर कोणी म्हणेल की, लोखंड गंजून जाते. परंतु तो गंजलेल्या मातीचा थरही आम्ही ओळखू शकतो. कारण पुरातत्त्ववेत्ता हा आता एक शास्त्रज्ञ झालेला आहे आणि सर्व प्रकारचे बदल तो एखाद्या डिटेक्टिव्हप्रमाणे शोधू शकतो.

लोखंडाची जी आयुधे आणि हत्यारे भारतात सापडली आहेत त्यांचा अभ्यास केला तर धक्काच बसतो. कारण ही सर्व प्राथमिक स्वरूपाची असून इ. स. पू. १००० ते इ. स. पू. ३०० मधील आहेत. तलवार, खंजीर, परशु यांना सध्यासारख्या लाकडी मुठी नाहीत. अशी मूठ असलेली हत्यारे पश्चिम आशियात इ. स. पू. २५०० या कालातील थरात मिळाली आहेत. भारतात मात्र खंजीर, दोन लाकडी दांड्याच्या सहाय्याने बांधला जाई.

जेव्हा इंडो–ग्रीक, कुशाण आणि शक लोक येऊ लागले तेव्हा त्यांनी स्वतंत्र मुठीची विकसित आयुधे भारतात आणली. याचा उत्तम पुरावा सर जॉन मार्शलना तक्षशीलेच्या उत्खननात मिळाला. यासंबंधी अधिक जिज्ञासा ज्यांना असेल त्यांनी तक्षशीला उत्खननाचे तिन्ही रिपोर्ट पहावेत.

तसेच कौशांबी येथील उत्खननात सापडलेली जी बाण, खंजीर इत्यादी हत्यारे आहेत त्या सर्वांना लाकडी मूठ बसविण्यासाठी सोय केलेली दिसते. ही सर्व हत्यारे शककुशाण कालातील आहेत.

यावेळी भारतात तक्षशीलेपासून पाटण्यापर्यंत आणि दक्षिणेत नाशिक, तेर, कोल्हापूर नागार्जुनकोंडा इत्यादी ठिकाणी उत्तम शहरे अस्तित्वात आलेली होती. त्यापैकी तक्षशीलेमध्ये मार्शलनी बरेच वर्षे उत्खनन केले. त्यात असे आढळून आले की, मौर्य काळात घरे लहान होती आणि रस्ते वाकडे तिकडे होते. जी नगरे इंडो–ग्रीक आणि शक लोकांनी वसविली होती त्यात रस्ते रुंद आणि सरळ होते (मोहेंजोदारोप्रमाणे). यावरून प्राचीन भारतातील नगर-रचना दोन कालखंडात विभागता येईल. एक म्हणजे इ. स. पू. २५०० पासून इ. स. पू. १५०० पर्यंत आणि दुसरा इ. स. पू. ३०० ते इ. स. ४००–५०० पर्यंत. मधल्या काळात ज्या काही वसाहती होत्या त्या लहान होत्या आणि त्यांचा समावेश शहरी संस्कृतीत होता. याचा पुरातत्त्वीय पुरावा मिळाला आहे. उत्तर भारतात Painted Grey Ware नावाची संस्कृती इ. स. पू. १००० ते इ. स. पू. ४०० पर्यंत होती. या संस्कृतीची पन्नासच्या वर ठिकाणे सापडली आहेत. मी स्वत: बिकानेर संस्थानात (गंगानगर जिल्हा) हिंडून ही सर्व ठिकाणे पाहिली आणि Indian Archaeology. A Review मधून त्यांचे वर्णन वाचले. ही सर्व ठिकाणे लहान आहेत. दोन वर्षांपूर्वी हरियाणा प्रांतात भगवानपुरा येथे उत्खनन झाले आणि तेथे ५. ६ खोल्याचे एक घर मिळाले आहे. Painted Grey Ware संस्कृतीतील हे सर्वात मोठे घर आहे. हे बहुधा मातीचे बनवलेले होते.

मध्य प्रदेशात नावडाटोलीच्या उत्खननात आम्हाला उत्तम प्रकारची चित्रित मातीची भांडी मिळाली. येथील सर्व घरे एक अथवा दोन खोल्यांची होती. घर बांधताना माती आणि लाकडी खांबांचा उपयोग केला होता. त्यानंतर पुण्याजवळ इनामगाव येथे आम्ही ६ वर्षे उत्खनन केले आणि ते अजूनही चालू आहे. येथे वरच्या थरात ४० घरे मिळाली. ही सर्व गोलाकार आणि लहान आहेत. मधल्या थरात दोन खोल्यांचे चौकोनी घर सापडले. भारतात इतरत्र कोठेही ताम्रपाषाण कालीन संस्कृतीचे असे उत्खनन झालेले नाही. माझ्या अनुभवाने मी सांगू शकतो की, भारतात बिहार, उत्तर प्रदेश आणि पंजाबमध्ये जर उत्खनन केले तर तेथे मातीची लहान घरे मिळतील. कर्नाटका-तही आम्ही दोन ठिकाणी उत्खनन केले तेथेही गोलाकार लहान घर मिळाले.

आता महाभारतयुद्धाचा काळ, त्यावेळची संस्कृती, नगररचना, नागरी जीवन इत्यादींचा विचार करताना पुरातत्व शास्त्राने मागच्या २५ वर्षात जी पार्श्वभूमी तयार केली ती आपल्या डोळ्यासमोर ठेवायला हवी.

वर मी वारंवार सांगितले आहे की, सिंधुसंस्कृतीची मोहेंजोदारो, हरप्पा, लोथल इत्यादी नगरांखेरीज दुसरी ठिकाणे लहान असण्याची शक्यता आहे. महाभारत आणि रामायण यामध्ये आपण जे वर्णन वाचतो त्यात अतिशयोक्ती आहे यात शंकाच नाही. ती बाजूला ठेवली तर ही शहरे आपण कोणत्या काळात ठेवू शकतो ? अयोध्येचे जे वर्णन सध्यांच्या रामायणात आहे ते इसवी सनाच्या पूर्वीचे नाही. तसेच द्वारका आणि हस्तिनापूरचे आहे. अयोध्येचा मी बारकाईने अभ्यास केला आहे आणि तो दुसऱ्या लेखात प्रसिद्ध करीन.

येथे आपण महाभारत युद्धापुरता विचार केला तर सध्याच्या महाभारतात वारंवार सांगितले आहे की, तलवार इत्यादी शस्त्रे लोखंडाची होती (कार्ष्णायस). त्यावेळी रथ, घोडे इत्यादी जरूर होते, तथापि आपण रथाचा इतिहास पाहिला तर इ. स. पू. १५०० च्या पूर्वी जे रथ होते. ते भरीव चाकांचे होते. त्यानंतर चाकांना आरे ( Spokes ) असलेल्या रथाचा शोध लागला. याचा उत्तम पुरावा आपल्याला इजिप्तमध्ये आणि नंतर मेसोपोटेमियात पहायला मिळतो. महाभारत युद्धात गांधार, कंबोज, मद्र, सिंधु, सौवीर, कुरु, पांचाल, मगध इत्यादींनी भाग घेतल्याचे वर्णन आहे; परंतु इ. स. पू. १००० मध्ये ही सर्व राज्ये लहान होती. हे आम्ही आमच्या पुरातत्त्वीय अनुभवाने सांगू शकतो. आपल्या साहित्यातील उल्लेख हेच दर्शवतात की, ज्याला आपण साम्राज्य म्हणतो ते बिहारमध्ये शिशुनाग राजाने प्रथम अस्तित्वात आणले. आणि त्यातूनच मौर्य साम्राज्य उदयास आले. ही एक ऐतिहासिक घटना होती. मग महाभारतातील राजांजवळ चतुरंग सेना असणे शक्य नाही. महाभारत युद्धामध्ये द्वंद्वयुद्धे प्रामुख्याने दिसून येतात. ‘एवं द्वंद्वयुद्धसहस्राणि रथवारणवाजिनाम् । भीष्मपर्व 6. 44. 77.’ बहूनि सुचित्राणि द्वंद्वयुद्धानि संजय त्वयोक्तानि द्रोणपर्व. 7. 14. 6. ’संजय धृतराष्ट्राला सांगतो की, मी तुझ्यापुढे असंख्य द्वंद्वयुद्धांचे वर्णन केले आहे. दुसरीकडे असेही वर्णन आहे की, हे द्वंद्वयुद्ध होत असताना इतर सैनिक प्रेक्षकांचे काम करत. याचा अर्थ असा की, महाभारत म्हणजे वैयक्तिक सामर्थ्याचे युग होते. तेव्हा या काळी वैयक्तिक सामर्थ्य, चातुर्य, कौशल्य यांना गदायुद्ध रथयुद्ध इत्यादीतूनच वाव होता.

दुर्दैवाने हीच प्रथा वर्षानुवर्षे आपल्या येथे चालू राहिली, आणि जेव्हा अलेक्झांडर आणि पुरू यांचा सामना झाला तेव्हा अलेक्झांडरच्या अश्वसेनेपुढे पुरूचा निभाव लागला नाही. तसाच अनुभव आपल्याला इतिहासात वारंवार आला आहे. अगदी अलीकडे मॉंट्रिऑलमध्ये जागतिक हॉकी स्पर्धेत आपला पराजय झाला तो याच कारणाने.








महाभारतयुद्ध झाले होते हे मी मानतो. पण त्यात द्वंद्वयुद्ध प्रामुख्याने होत होते. आणि त्याचा काळ इ. स. पू. १००० असण्याची शक्यता आहे. कारण या काळातच उत्तर भारतात Painted Grey Ware नावाची संस्कृती अस्तित्वात होती आणि तिचे अवशेष उत्तरेस अफगाणिस्थानपासून दक्षिणेस उज्जैनपर्यंत मिळतात, आणि पश्चिमेस सिंधूपासून पूर्वेस नेपाळपर्यंत मिळतात याचा अर्थ मी असा करतो की, या काळात एकसारखी संस्कृती या सबंध प्रदेशात होती. ह्या संस्कृतीत शेती आणि गोपालन मुख्यत्वे होते. नगरे आणि खेडी लहान होती. एका विशिष्ट प्रकारची मातीची भांडी हे लोक वापरत होते. लोक मांसाहारी होते आणि गोमांस प्रामुख्याने खात असत. या काळात लोखंडाचे ज्ञान प्रथमच झाले होते. याचा अर्थ असा नाही की, तांबे लोक वापरत नव्हते. लोखंडाची हत्यारे पश्चिम आशिया, इजिप्त, मेसोपोटेमिया, इस्रायल यांच्या मानाने भारतात अगदी प्राथमिक स्वरूपाची होती.

वरील निष्कर्ष कोणालाही समजू शकेल. त्यासाठी मी ५ लाख वर्षांची आयुधे, वहाने इत्यादींचा एक तक्ता केला आहे तो पुढे देत आहे. वर सांगितल्याप्रमाणे आमची भूमिका वास्तववादी आहे. महाभारतात पुष्कळ अतिशयोक्ती असून त्यात वारंवार भर पडली आहे. ही भर केव्हा आणि कशी पडली याचा चिकित्सक दृष्टीने डॉ. सुखटणकर आणि त्यांचे सहयोगी लोकांनी चिकित्सक आवृत्ती प्रसिद्ध केली. सध्या मी आणि माझी शिष्या कु. गौरी लाड रामायण आणि महाभारताचा अभ्यास करून ही भर कशी पडली याचा आढावा घेत आहोत. हे दोन्ही प्रबंध एक–दोन वर्षात प्रसिद्ध होतील.

आता महाभारत युद्धाच्या काळाबद्दल एकच गोष्ट नमूद करतो. ती म्हणजे महाभारतात सतीची चाल असल्याचा उल्लेख आहे. पांडूच्या मागे माद्री आणि दुर्योधन व कृष्णानंतर त्यांच्या बायका सती गेल्याचा उल्लेख आहे. ही प्रथा वैदिक साहित्यात आढळत नाही. यांचा चांगला परामर्श डॉ. अळतेकर आणि म. म. काणे यांनी History of Dharmashastra यात घेतला आहे. त्यांनी निष्कर्ष काढला आहे की, सतीची प्रथा भारतात इ. स. पू. ४ थ्या शतकात रूढ झाली. असे असेल तर आदी महाभारतकाळ आणि हा काळ यात फार अंतर पडणे शक्य नाही. म्हणजे जर आपण महाभारत युद्धाचा काळ इ. स. पू. १४०० धरला तर कमीत कमी १००० वर्षांचे अंतर पडेल आणि जर इ. स. पू. ९०० चा काळ धरला तर हे अंतर अर्धे होईल. अशातऱ्हेने आमच्या अभ्यासात आम्ही कमीत कमी २५ गोष्टींचा विचार केला आहे, आणि आयुधांप्रमाणेच विचार, प्रथा आणि वस्तूंचा तक्ता आम्ही केला आहे.

(हा लेख मी कु. वासंती जोशी यांच्या साहाय्याने मराठीत लिहिला आहे.)

◆ ◆ ◆




AXES AND POINTS; STONEAGE
FIG: 1




CHARIOTS THROUGH THE COPPER BRONZE & IRON AGES
FIG: 6



EVOLUTION OF THE MACE
STONE & BRONZE AGES
FIG: 2

EVOLUTION OF WEAPONS THROUGH THE AGES
(C.26,00,000–C.400 A.D.)

(LEFT) W.ASIA. AFRICA. AND CHINA

(RIGHT) INDIA



FIG: 3 EVOLUTION OF THE AXE

प्राचार्य ए बी. शिंदे

# एका स्वयंभू व्यक्तिमत्त्वाचे चेतोहर चित्रण

## 'यशवंतराव : इतिहासाचे एक पान'

ना. यशवंतराव चव्हाण यांच्याविषयी मराठीत बऱ्याच मंडळींनी लिहिले आहे. ते विशाल द्विभाषिक राज्याचे मुख्यमंत्री झाल्यापासून पुष्कळ लिहिले गेले. त्यात गौरवग्रंथ, छोटी चरित्रे, त्यांच्या व्याख्यानांचे संग्रह यांचा समावेश करता येईल. इंग्रजीतही त्यांच्यावर ग्रंथलेखन झाले आहे. काँग्रेस शिबिरात किंवा जाहीर सभांत क्वचित प्रसंगी त्यांनी स्वतःविषयी केलेल्या ओझरत्या उल्लेखातून त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचे दर्शन घडते. यशवंतरावांच्या व्यक्तिमत्त्वाचे सामग्र्याने दर्शन घडविणाऱ्या एका बृहद्ग्रंथाची आवश्यकता सतत जाणवत होती. रामभाऊ जोशीलिखित 'यशवंतराव : इतिहासाचे एक पान' या ग्रंथाने ही पोकळी भरून काढली आहे. रामभाऊ जोशी यांनी यशवंतरावांचे व्यापक असे चरित्र अत्यंत परिश्रमपूर्वक लिहिले आहे. या ग्रंथाच्या पानापानातून यशवंतरावांच्या व्यक्तिविकासाचा, राजकारणातील वाटचालीचा, राष्ट्रभक्तीचा, काँग्रेसनिष्ठेचा आणि सामाजिक प्रगतीविषयीच्या कळकळीचा प्रत्यय येतो.

यशवंतरावांचे बहुमिती (multi-dimensional) व गतिमान असे जीवन एका ग्रंथात समाविष्ट करणे ही कठीण गोष्ट. पण रामभाऊ जोशी यांनी ते कार्य यशस्वीपणे केले आहे. प्रस्तुत ग्रंथाचे स्थूलपणे तीन भाग दिसतात. पहिल्या आठ प्रकरणात यशवंतरावांचे व्यक्तिजीवन, स्वातंत्र्याचे आंदोलन व स्वातंत्र्यप्राप्ती, खेरांच्या व मोरारजींच्या मंत्रिमंडळात यशवंतरावांचा समावेश येथपर्यंतच्या घटना आल्या असून, ही प्रकरणे निःसंशय वाचनीय झाली आहेत. ९ ते २० या प्रकरणांचा एक स्वतंत्र विभाग बनतो. संयुक्त महाराष्ट्र-आंदोलन संयुक्त महाराष्ट्राची स्थापना, संयुक्त-महाराष्ट्र परिषद, संयुक्त-महाराष्ट्र समिती, जनकाँग्रेस, काँग्रेसपक्षाची भूमिका, यशवंतरावांची भूमिका इ. गोष्टींचा

अनुक्रमणिका

इतिहास या दुसऱ्या खंडात सापडतो. तिसऱ्या विभागात २१ ते २५ ही प्रकरणे समाविष्ट होतात. दिल्लीतील वास्तव्य हे यशवंतरावांच्या जीवनातील एक वेगळेच पर्व आहे. संरक्षणमंत्री, गृहमंत्री, अर्थमंत्री आणि परराष्ट्रमंत्री अशा विविध पदावर काम करणाऱ्या यशवंतरावांचे राजकीय जीवनचित्र येथे प्रामुख्याने पहावयास मिळते. दुभंगलेल्या कॉंग्रेसचा इतिहासही या प्रकरणातून प्रगट होतो.

यानंतर प्रस्तुत चरित्रग्रंथास एक परिशिष्ट जोडले असून त्यास 'व्यक्तिदर्शन' असे शीर्षक दिले आहे. यशवंतरावांची दिनचर्या, पोषाख, त्यांच्या आवडी–निवडी, वाचन, पत्नी, मित्र, आप्त व इतरेजन यांच्याशी वागण्याची त्यांची वैशिष्टयपूर्ण पद्धती, यशवंतरावांच्या व्यक्तिजीवनातील अनेकविध प्रसंग यांच्याद्वारा त्यांचे व्यक्तिदर्शन खरोखरच सुंदर घडविले आहे.

महाराष्ट्राच्या आणि भारताच्या शैक्षणिक, राजकीय, सामाजिक जीवनातील यशवंतरावांचे स्थान हे महत्त्वपूर्ण असे आहे. या विविध क्षेत्रांवर त्यांनी आपला स्वतःचा असा एक ठसा उमटविला आहे. अशा या व्यक्तिमत्त्वाविषयीचा हा ग्रंथ वाचल्यावर काही ठळक गोष्टी मनात घर करुन राहतात. १२ मार्च १९१४ रोजी देवराष्ट्रे या गावच्या एका सामान्य शेतकरी कुटुंबात यशवंतरावांचा जन्म झाला. लौकिक अर्थाने कोणताही शैक्षणिक, सांस्कृतिक किंवा सांपत्तिक वारसा नसताना आयुष्यामध्ये यशवंतरावांनी जी वाटचाल केली ती स्वतःच्या हिंमतीने अक्कल-हुषारीने व जिद्दीने. यशवंतरावांचे व्यक्तिमत्त्व या चरित्रातून स्पष्टपणे जाणवते ते स्वयंभू, स्वनिर्मित असे. प्रारंभीच्या काळातील त्यांच्या कौटुंबिक अडचणी पाहून कोणताही माणूस खचून गेला असता. परंतु दुर्दम्य आशावाद, सातत्याने परिस्थितीवर मात करण्याची जिद्द, राष्ट्रभक्तीची प्रेरणा या गुणांमुळे जीवनातील त्यांचे तारू कधीही डळमळले नाही. वडिलांच्या निधनाने लहान वयातच पोरके झालेले यशवंतराव आपल्या बंधूंच्या प्रेमळ सहवासात व मातोश्रींच्या उबदार छायेत जीवनाचा मार्ग धीमेपणाने चोखाळतात. त्यांची सांपत्तिक स्थिती पाहता, कोणत्याही शहाण्या माणसाने राष्ट्रसेवेचा ध्यास सोडून आपला प्रपंच नेटका करणे पत्करले असते. परंतु यशवंतराव मूलतःच राष्ट्रप्रेमी आणि समाजप्रेमी असल्यामुळे सांसारिक अडचणींकडे पाठ फिरवून सामाजिक आणि राष्ट्रीय ऋण फेडण्यासाठी ते उभे ठाकले.

ग्रंथ आणि समाज हे यशवंतरावांचे गुरू. त्यांच्या व्यक्तिमत्त्वाच्या जडण–घडणीत त्यांच्या मातोश्रींचा, पत्नीचा आणि मित्रांचा काहीच भाग नाही,

असे नाही. पण हे व्यक्तिमत्त्व उमलले ते स्वयंभू आणि स्वयंप्रज्ञ अशा रूपाने. प्रगाढ वाचनाने आणि चिंतनाने या व्यक्तिमत्त्वाला सुंदर घाट दिला. इंग्रजी शाळेत आणि महाविद्यालयात असताना आणि तुरुंगवासाच्या काळातही विविध विषयांवरील ग्रंथांचे वाचन करून त्यांचे व्यक्तिमत्त्व अधिक संपन्न बनले. महाविद्यालयात त्यांच्या उद्याच्या जीवनाची पूर्वतयारी वाचन-चिंतनाद्वारे चालू होती. तुरुंगात असताना यशवंतरावांनी जे चौफेर वाचन केले त्याची यादी उपलब्ध आहे. तात्त्विक राजकारणापासून हिंदी संस्थानिकांपर्यंत आणि ऐतिहासिक व्यक्तींच्या चरित्रांपासून भारताच्या दारिद्र्यविषयक प्रश्नांपर्यंत विविध विषयांवरील ग्रंथ त्यांनी वाचले. राजकारणाच्या गदारोळातही काव्याचा रसास्वाद घेण्यास ते चुकले नाहीत. इंग्रजी आणि मराठी साहित्य ते भरपूर वाचतात. हरिभाऊ आपटयांपासून आनंद यादवापर्यंत अनेक कादंबरीकार त्यांनी वाचले आहेत. हेच विविध वाङमयप्रकारांबद्दलही म्हणता येईल.

यशवंतराव अगदी तरुण वयातच सत्तेवर आले. गेल्या तीस वर्षांत सत्तेवर असूनही त्यांच्या वाचन-चिंतनात खंड पडलेला नाही. या संदर्भात एक वैयक्तिक उल्लेख अस्थानी ठरू नये. १९६८ मध्ये यशवंतरावांनी वाईच्या विश्वकोश कार्यालयाला भेट दिली. दौऱ्याच्या धावपळीत असल्यामुळे 'गेले चार दिवस मी अक्षरशत्रू आहे' असे ते खाजगीत सहज म्हणाले. त्यांच्या या उद्‌गारातून त्यांना असलेला वाचनाचा हव्यास स्पष्ट होतो.

राजकारणातील व्यक्तींचे व राजकारणाबाहेरच्या लोकांचे विचार ऐकण्याचाही यशवंतरावांना मोठा हव्यास आहे. विद्वान माणसे तर त्यांना आवडतातच, पण त्यापेक्षाही सामान्य अडाणी माणूस अधिक आवडतो. ४०-४५ वर्षांच्या राजकारणात आणि समाजकारणात भेटलेल्या अनेक प्रवृत्तींच्या आणि प्रकृतींच्या माणसांनी यशवंतरावांचे अनुभवविश्व संपन्न केले आहे. सतत सरकारी फायलींचे रूक्ष वाचन करणाऱ्या यशवंतरावांना लोकहिताच्या नवनव्या कल्पना कशा सुचतात, त्यांचा बौद्धिक पाठलाग कसा सुरू असतो, याचे अनेकदा कोडे पडते. पण यशवंतरावांच्या अवती-भवती असलेले ग्रंथ आणि जनसंभार पाहिला की, त्यांच्या बुद्धिवैभवाचे आणि स्नेहशीलतेचे दर्शन अधिक स्पष्ट होत जाते. सतत वाचन-चिंतन-चर्चा आणि जनता संपर्क यातून यशवंतरावांचे व्यक्तिमत्त्व कसे घडले याचे दर्शन हा ग्रंथ वाचत असताना पानोपानी घडते.

यशवंतराव साहित्यिक, कलाप्रेमी आणि चतुर राजधुरंधर आहेत. याचा प्रत्यय त्यांच्या प्रशासनातही येतो. नवीन खात्याची सूत्रे घेतल्यानंतर ते त्या

खात्याचे प्रश्न समजावून घेतील. त्यासंबंधीचे वाचन करतील आणि त्या खात्यातील कामकाजासंबंधी चर्चाही करतील. असे करताना ते कुणाचा पाणउतारा करणार नाहीत आणि कुणाला अकारण महत्त्वही देणार नाहीत. सर्वांची मने सांभाळताना कारभाराच्या मुख्य सूत्रापासून न ढळण्याची जागरुकता हे त्यांचे मोठेच वैशिष्टय होय. या गुणामुळे ते यशस्वी शासक तर झालेच, पण अभिजात साहित्याभिरुची राखणारे लोकप्रिक नेतेही ठरले. मुख्यमंत्री झाल्यानंतरच्या काळात (१९५७ ते १९६२) त्यांनी जे निर्णय घेतले त्यांतून सामाजिक, आर्थिक, औद्योगिक, शेती व शिक्षणविषयक जीवनातील महाराष्ट्राचा चेहरामोहरा पार बदलून गेला. असे करताना मुख्यमंत्र्या-इतकीच लोककल्याणकारी हितचिंतकाची फार मोठी भूमिका अत्यंत यशस्वीपणे त्यांनी पार पाडली. जनजीवनात स्नेहभावाचे माप त्यांनी पुरेपूर घातले आणि जनजीवनाने आपल्या स्नेहभावाने त्याना भारावून टाकले. शासन आणि जन-जीवन यांचे असे अद्वैत आणि स्नेहपूर्ण नाते निर्माण करण्यात यशवंतरावांच्या व्यक्तिमत्त्वाचा आणि कर्तृत्वाचा वाटा मोठा आहे. या कारकीर्दीतील त्यांची भाषणे हा या स्नेहभावाचा मोठा पुरावा आहे. वाचन, चिंतन आणि रसिकता यांनी संपन्न असलेल्या व्यक्तिमत्त्वाचा आविष्कार किती सुरेख होऊ शकतो, हे येथे पहावयास मिळते. यामुळेच देशातील स्थिर, पुरोगामी आणि सर्व बाबतीत जागरुक राज्य अशी महाराष्ट्राची जी प्रतिमा भारतभर निर्माण झाली त्याचा आलेख या ग्रंथात सविस्तर रेखाटला आहे.

यशवंतरावांची काँग्रेसनिष्ठा अभंग आणि अढळ आहे. त्यांचे सौ. वेणूताईंवर जेवढे प्रेम आहे, तेवढेच काँग्रेस पक्षावर आहे. त्यांच्या राजकीय जीवनात सहा वेळां असे प्रसंग आले की, त्यावेळी त्यांनी काँग्रेस सोडली असती, तरीही जनतेने त्यांचे स्वागतच केले असते. पण यशवंतराव अव्यभिचारी निष्ठेने काँग्रेसचे शिपाई म्हणून कार्य करीत राहिले; करीत आहेत. यशवंतरावांचा राजकीय जन्म काँग्रेसमध्ये झाला. काँग्रेसमध्ये ते वाढले आणि मोठे झाले. काँग्रेसही त्यांच्यामुळे महाराष्ट्रात टिकली, मोठी झाली. मित्रांचा, लोकांचा, कार्यकर्त्यांचा काहीवेळा गैरसमज होऊन देखील यशवंतरावांनी कोणत्याही कारणामुळे काँग्रेसशी प्रतारणा केली नाही.

१९३४ मध्ये काँग्रेस समाजवादीपक्ष स्थापन झाला. सुरवातीला यशवंतराव या पक्षाकडे आकर्षिले गेले होते. पण या पक्षाची कामाची पद्धत आणि तऱ्हा पाहिल्यानंतर ते तेथे फार काळ रमले नाहीत. स्वातंत्र्याची चळवळ ही इंग्रजांचे राज्य घालविण्यापुरती मर्यादित नाही. समाजातील विषमता दूर

करून समता निर्माण केली पाहिजे, हा या चळवळीसंबंधींचा विचार त्यांच्या मनात पक्का झाला होता.

यानंतरच्या काळात एम्. एन्. रॉय यांच्या तत्त्वज्ञानाने यशवंतरावांच्या मनाची पकड घेतली. रॉय यांच्या नेतृत्वाखाली निश्चित स्वरूपाचा सामाजिक क्रांतीचा कार्यक्रम त्यांच्या मनात तयार होत होता. या सुमारास सुरू झालेल्या दुसऱ्या महायुद्धाच्या धोरणाविषयी रॅडिकल काँग्रेसजनांत मतभेद झाले. अखेरीस काँग्रेस संघटनेचे विचार आणि काँग्रेसवरील विश्वास यांचाच विजय झाला. व राजकीय विचारप्रणालीसाठी रॉय यांचे यशवंतरावांनी धरलेले बोट सुटले.

पुढे यशवंतराव पुण्यात आले. वसाहतवादाविरुद्धच्या लढ्यासाठी काँग्रेस निश्चित स्वरूपात काहीच करीत नव्हती आणि सर्वत्र केवळ चर्चाच चालू होत्या. काहीतरी करण्यासाठी धडपडणाऱ्या यशवंतरावांच्या मनाचा या परिस्थितीने कोंडमारा केला. या कुचंबलेल्या अवस्थेतून बाहेर पडण्यासाठी त्यांना मार्ग दिसला तो कम्युनिस्ट बनण्याचा. कारण कम्युनिस्ट काही वेगळे बोलत होते. कम्युनिस्टांच्या भडक घोषणांचे आकर्षण त्यांच्या मनात निर्माण झाले होते. त्यातूनच एक दिवस युद्ध-विरोधी कार्यक्रमाच्या आखाड्यात उतरलेल्या कम्युनिस्ट पक्षाबरोबर का जाऊ नये, असा त्यांनी विचार केला. मनाचा कौल झाला खरा, पण कम्युनिस्ट पक्षाची दोरी प्रत्यक्ष अडकवण्यापूर्वी आणि लाल तारा डोक्यावर धरण्यापूर्वी रात्रंदिवस ज्यांच्याबरोबर काँग्रेसचे कार्य केलें, त्यांच्याशी चर्चा करून, त्यांना विश्वासात घेऊन मगच कम्युनिस्टांचे सहकार्य घ्यावे, असे दुसरे मन आतून सांगू लागले. आणि तेही खरेच होते. साथीदार, मित्र कार्यकर्ते यांच्याशी चर्चा करण्यासाठी आणि कम्युनिस्ट बनण्याचा विचार त्यांच्याही मनात उतरविण्यासाठी यशवंतराव साताऱ्याला दाखल झाले. सातारा आणि वाई येथे या विषयावर तीन दिवस अहोरात्र चर्चा झाली. कोणत्या वेळी नेमके काय करायचे याचा निर्णय प्रमुख नेत्यांनी करायचा असून गांधी-नेहरू त्या दृष्टीने निर्णय करतीलच, असे मित्रांनी सांगितले. अशा स्थितीत काँग्रेस-बरोबर राहूनच स्वातंत्र्याची चळवळ करीत रहायचे, असा मनाशी निर्णय करून यशवंतराव परतले.

खेरमंत्रिमंडळाची सत्ता ही सांस्कृतिक हितसंबंधांची जपणूक करणारी शहरी राज्यसत्ता असल्याचा आरोप बहुजनसमाजातील राजकीय नेते उघड उघड करू लागले होते. वस्तुस्थिती काहीशी तशीच होती. शेतकरी-कामकरी पक्षाच्या स्थापनेची बैठक याच सुमारास भाऊसाहेब राऊत यांच्या घरी झाली. त्यावेळी शेतकरी-कामकरी पक्षाच्या स्थापनेला आणि काँग्रेसपासून

फुटून निघण्याला यशवंतरावांनी सक्त विरोध दर्शविला. यशवंतरावांना वगळून महाराष्ट्रात शेतकरी– कामकरी पक्षाची स्थापना म्हणजे काँग्रेस पक्षाला एक आव्हानच ठरले. बहुजनसमाजाचे मुरब्बी नेते या पक्षाच्या आश्रयाला गेले. अशा परिस्थितीत काँग्रेस पक्षाला सावरण्याची यशवंतरावांनी जय्यत तयारी केली. ते व त्यांचे सहकारी कार्यकर्ते मुंबई राज्यभर हिंडले. त्यांनी काँग्रेसची भूमिका जनमानसात रुजविली. १९५२ च्या सार्वत्रिक निवडणुकीत महाराष्ट्र काँग्रेस विरुद्ध शे. का. पक्ष असा निकराचा सामना होऊन जेधे–मोरे यांचा नवा पक्ष भुईसपाट झाला अशा विशिष्ट काळात महाराष्ट्रात काँग्रेस तरली ती यशवंतरावांच्या विधायक विचारामुळेच. हा इतिहास आहे. यशवंतरावांच्या प्रखर आणि आकर्षक व्यक्तिमत्त्वामुळे बहुजनसमाजातील असंख्य कार्यकर्ते ( विरोधी पक्षातीलही ) यशवंतरावांना येऊन मिळाले. यशवंतरावांमुळे बहुजनसमाजाच्या नेतृत्वाला स्थिरता प्राप्त झाली. यशवंतरावांनी बहुजनसमाजाला नेतृत्व दिले ही गोष्ट महाराष्ट्राच्या सामाजिक जीवनाच्या इतिहासात महत्त्वपूर्ण अशी आहे.

१९४६ ते १९६० या काळात संयुक्त महाराष्ट्राच्या स्थापनेसाठी जे प्रचंड जनता आंदोलन झाले, त्याला अन्यत्र तोड नाही. या आंदोलनात यशवंतरावाविषयी खूप गैरसमज झाले. काही पसरविण्यात आले. काँग्रेसचे एकनिष्ठ सेवक म्हणून पक्षाच्या आदेशाप्रमाणे त्यांनी द्विभाषिक राज्य काही काळ राबविले. त्यामुळे त्यांना जनतेचा रोष पत्करावा लागला; आणि एका वेगळयाच अग्निदिव्यातून जावे लागले. पण योग्य वेळ येताच द्विभाषिक चालविण्याचीकसरत फार काळ करता येणार नाही अशी पं. नेहरूंजवळ त्यांनी कबुलीही दिली. या सर्व गोष्टींचा परिपाक म्हणजे संयुक्त महाराष्ट्राची निर्मिती. यशवंतराव महाराष्ट्राभिमानी असले तरी या प्रचंड आंदोलनात काँग्रेस पक्षाच्या निष्ठेपासून यत्किंचितही ढळले नाहीत. यामुळे त्यांच्यावर खूप टीका झाली. पण त्यांनी तिची तमा बाळगली नाही.

१९६९ च्या नोव्हेंबरात म. गांधी–पं. नेहरूंची काँग्रेस दुभंगली. इंडिकेट –सिंडिकेट मध्ये तिचे रूपांतर झाले. या गदारोळांत यशवंतराव 'कुंपणावर संधिसाधुपणाने बसले होते ' असाही सूर काही टीकाकारांनी लावला. काँग्रेस दुभंगू नये ही पक्षनिष्ठ कार्यकर्त्यांची तळमळ यशवंतरावांच्या मनात होती. त्यासाठी त्यांनी खूप प्रयत्न केले. पण प्रतिगामी मंडळी जेव्हा हट्टास पेटली, तेव्हा पुरोगामी विचारांच्या इंदिरा गांधीसमवेत उभे राहून सिंडिकेटवाल्यांशी मुकाबला करण्यास त्यांनी मागेपुढे पाहिले नाही. हा इतिहास ताजा आहे. यशवंतरावांनी आपली वाटचाल स्वतःच्या हिंमतीवर दूरदृष्टीने आणि

अनुक्रमणिका

निष्ठायुक्त भूमिकेतून केली. महत्त्वाच्या प्रसंगी योग्य निर्णय घेण्याचे सामर्थ्य आणि दृष्टिकोन हे यशवंती व्यक्तिमत्त्वाचे वैशिष्टय. परिस्थितीचे अचूक निदान, राजकारणातील घटना-प्रसंगांचे हंसक्षीरन्यायाने विश्लेषण हा या स्वयंभू व्यक्तिमत्त्वाचा विशेष आहे. त्यांचा कुणी गुरु नाही. कुणी सल्लागार नाही. स्वतःचा मार्ग स्वतः शोधणारे ते एकांडे शिलेदार आहेत. मूळची प्रज्ञा आणि वाचन-चिंतन, निरीक्षण, सहवास यांचे तीवर झालेले संस्कार, यातूनच हे व्यक्तिमत्त्व व कर्तृत्व उदयाला आले आहे रामभाऊ जोशींनी अशा या बहुमिती व्यक्तिमत्त्वाचा शोध घेण्याचा यशस्वी प्रयत्न या चरित्रात केला आहे.

कोणत्याही चरित्रग्रंथात-चरित्रनायकाचे व्यक्तिमत्त्वच प्राधान्याने प्रकट होणे आवश्यक असते. यशवंतरावांसारखे बहुमिती व्यक्तिमत्त्व रंगविताना, राजकीय, सामाजिक घटना, आंदोलने यांची माहिती देताना चरित्रातील कलात्मकता राखणे ही चरित्रलेखकाच्या दृष्टीने मोठीच कसरत होय. या चरित्राच्या पूर्वार्धात रामभाऊंनी हा तोल सुरेख साधला आहे. उत्तरार्धात मात्र घटनांचा तराजू जड होतो, परंतु देशातील प्रत्येक घटनेशी चरित्रनायक संबंधित असल्याने ते अपरिहार्य होय. संयुक्त महाराष्ट्राची चळवळ हे महाराष्ट्राच्या जीवनातील महान पर्व आहे याविषयी संदेह नाही. पण चरित्रग्रंथात नायकाच्या व्यक्तिदर्शनाला अडथळा करण्याइतपत त्याचा विस्तार मान्य होणे कठीण आहे. डेमी साईज ५२० पानांच्या या ग्रंथांत संयुक्त महाराष्ट्र आंदोलनासाठी सुमारे २३१ पाने खर्ची पडली आहेत. अशावेळी आपण संयुक्त महाराष्ट्र स्थापनेचा इतिहास तर वाचत नाहीना, असा भास होतो. या गदारोळात यशवंतरावांच्या व्यक्तिदर्शनासाठी आसुसलेला वाचक कदाचित अतृप्त राहील. परंतु एक गोष्ट खरी कीं, संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीतील अनेक सुप्त घटना या ग्रंथातील सविस्तर विवेचनामुळे प्रकाशात आल्या आहेत. १९४२ मध्ये साताऱ्यात झालेल्या आंदोलनाचे यशवंतराव हे प्रमुख सूत्रधार होते. त्यावेळी त्यांचा 'डिक्टेटर' असा नामोल्लेख होत असे. स्वातंत्र्यप्राप्तीच्या कालखंडातील प्रतिसरकार ही एक मोठीच चळवळ होती. या सर्व गोष्टींचा उल्लेख या चरित्रात यथाक्रम परंतु माफक स्वरूपात ग्रथित झाला आहे.

यशवंतरावांच्या दिल्लीतील वास्तव्याला आता चौदा वर्षे पूर्ण होत आली आहेत. या काळातील यशवंतरावांचे जीवन राजकीयदृष्टया अनेक नाटयपूर्ण प्रसंगांनी भरलेले आहे. त्यावर इंग्रजीत ग्रंथलेखनही झाले. यशवंतरावांचे व्यक्तिमत्त्व जो जो उंचावले, तो तो त्यांतील नाटयपूर्णता वाढली आहे. ती

समजावी अशी कुणाही वाचकाची इच्छा असणे स्वाभाविक आहे. लेखकाने हा कालखंड १२८ पानात ग्रथित केला असून त्यात व्यक्तींची आणि प्रसंगांची जंत्रीही आली आहे. यशवंतरावांच्या राजकीय जीवनातील या कालखंडाचे धागे-दोरे उलगडणे हे अत्यंत जोखमीचे काम असल्याने वाचकाला त्यासाठी आणखी कांहीं काळ थांबावे लागणे अपरिहार्य ठरते. यशवंतरावांविषयी इंग्रजी ग्रंथांतून जे मुद्दे उपस्थित केले गेले, त्यांचा परामर्श त्यामुळे रामभाऊंनी घेतला नसावा. वस्तुतः यशवंतरावांच्या स्नेहबंधामुळे तो रामभाऊंचा हक्क ठरतो. परंतु चरित्र-नायकाप्रमाणे त्यांनीही याप्रकरणी संयम पाळला आहे. रामभाऊंना यशवंतरावांचा प्रदीर्घ सहवास लाभला आहे. यशवंतरावांच्या जीवनातील घटना–प्रसंग, प्रसंगांतील पीळ आणि मनाचे कंगोरे मांडताना काही मोक्याच्या जागी रामभाऊ आणखी काही सांगतील; 'अंदरकी बात' स्पष्ट करतील अशी अपेक्षा बाळगणे स्वाभाविक ठरते. पण अशी स्थळे त्यामुळे मूकच राहिली आहेत. ग्रंथाच्या पूर्वार्धात चरित्र वाचल्याची सुखद जाणीव होते; मध्यभागी इतिहासाचे दर्शन घडते आणि ग्रंथाच्या अखेरीस प्रसंगांचा प्रवाह आणखी वाढत रहातो. असे असले तरी, 'व्यक्तिदर्शन' या परिशिष्टाने मात्र अनेक उणीवा भरून काढल्या आहेत.

यशवंतरावांच्या व्यक्तिमत्त्वाचे, त्यांच्या आवडी–निवडींचे, त्यांच्या स्वभाव–विशेषांचे अत्यंत मार्मिक दर्शन येथे घडते. व्यक्तिदर्शनाविषयी असे म्हणता येईल की, जेवणापेक्षा त्यानंतरचा विडा अधिक चांगला रंगला आहे रामभाऊ जोशी हे व्यासंगी पत्रकार आहेत. त्यांच्या सूक्ष्म निरीक्षणाचा प्रत्यय या ग्रंथात जागोजागी येतो. रामभाऊंची भाषा प्रासादिक अशी आहे. जेथे यशवंतराव डोकावतात तेथे ती अधिक रसाळ बनते. अनेकविध घटना–प्रसंगांनी आंदोलनांनी नटलेले यशवंतरावांचे जीवन एका चरित्रग्रंथात समाविष्ट करणे हे साधे काम नाही. रामभाऊ जोशी यांनी याबाबतीत परिश्रमपूर्वक पाऊल टाकले आहे ही अभिनंदनीय गोष्ट होय. प्रस्तुत चरित्रग्रंथामुळे मराठी चरित्रवाङमयात मोलाची भर पडली आहे, यात शंकाच नाही.

◆ ◆ ◆ ◆

---

यशवंतराव इतिहासाचे एकपान : लेखक – श्री. रामभाऊ जोशी, केसरी प्रकाशन, पुणे. ( आ. १ ली ) १९७६ पृ. १५+५३४. मूल्य तेवीस रुपये.

अनुक्रमणिका






